डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीनें बक्षीस दिलेला निबंध.

# मुक्तेश्वर.

[ आवृत्ति दुसरी. ]



लेखक,

बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.



प्रकाशक,

केशव भिकाजी ढवळे, बुकसेलर,

ठाकुरद्वार—मुंबई नं. ४.



मुंबई— मुंबईवैभव छापखान्यांत छापिला.



सन १९२६.



किंमत ६ आणे.

# प्रस्तावना.

प्रस्तुतचा निबंध प्रथमतः सुमारें वीस वर्षांपूर्वी मुंबईच्या श्रीसरस्वतीमंदिर मासिकांत खंडशः प्रसिद्ध झाला. नंतर त्यालें स्वतंत्र पुस्तक छापण्यांत आलें. त्याच्या दुसऱ्या आवृत्तीचा योग आज आला आहे.

या आवृत्तींत वादविवादाचा पाल्हाळ बराच कमी केला आहे. पहिल्या आवृत्तीनंतर उपलब्ध झालेल्या माहितीचाहीं योग्य स्थळीं उपयोग करून घेतला आहे. विषय परिच्छेदांना उचित मथळे देण्यांत आले आहेत.

मुक्तेश्वरांच्या अश्लीलत्वदोषाचा ऊहापोह करतांना, पहिल्या आवृत्तींत कांहीं अश्लील उतारे नमुन्याकरितां उद्धृत करण्याचा प्रमाद आमचे हातून घडला होता. प्रस्तुतच्या आवृत्तींत ते उतारे अजीबाद गाळून प्रमादाचें परिमार्जन केलें आहे.

मुरूड—जंजिरा, १०।५।२६

बा. अ. भिडे.



# विषयानुक्रमणिका.



# मुक्तेश्वर.

## १ कुलकथा.

आपल्या चरित्रनायकाचा जन्म थोर कुलांत झालेला असला व गुणवान् लोकविश्रुत अशा दुसऱ्या व्यक्तींशीं त्याचा नात्यागोत्याचा संबंध असला, तर त्याचें कौतुक वाटणें साहजिक आहे. बऱ्याच मराठी कवींची बहुतकरून नांवापलीकडे कुळकथा फारशी उपलब्ध नसल्यामुळें, ज्यांच्यासंबंधें वरील कौतुकजनक योग साधला आहे, असे कवि अगदींच विरळा. सुदैवानें या विरळ कवींमध्येंच मुक्तेश्वरांचा समावेश होतो. नृसिंहस्वामीचे शिष्य व दौलताबादचे कारभारी जे जनार्दनस्वामी, त्यांचे पट्टछात्र, 'दया, क्षमा, शांति' या गुणांनीं मंडित झालेले, 'बोले तैसा चाले' या वचनानुसार करारीपणानें वर्तून समाजांत पूज्य झालेले, ज्ञानदेवसमाधि, ज्ञानदेवी ग्रंथ, व पंढरीचा वारकरी पंथ, यांचा जीर्णोद्धार करणारे, आपल्या भागवतरामायणादि कृतींनीं मराठी सरस्वतीचे कंठभूषण बनलेले, व प्रेमळ भगवद्भक्ताच्या नात्यानें अखिल महाराष्ट्रांत कीर्तिरूपानें आजामितीपर्यंत जीवंत राहणारे, एकनाथस्वामी पैठणकर, हे मुक्तेश्वरांचे मातामह*—आईचे वडील-होत. एकनाथांना दोन† मुली होत्या; वडील गोदूबाई व धाकटी ‡गंगाबाई. पैकीं ज्येष्ठ मुलगी गोदूबाई ही पैठणासच चिंतामणि§ नांवाच्या अत्रिगोत्री व आश्वलायनसूत्री ब्राह्म-

* मातृजनक जनार्दनी। एकनाथ नमियेला. ॥ आदि. १।७७.

† या दोन्ही मुलींसंबंधानें केशव व महिपति या दोघांनींही त्रोटक माहिती दिली आहे. 'भरतखंडाचा अर्वाचीन कोश' या ग्रंथाचे कर्ते एकनाथास दोन मुली होत्या, ही गोष्ट चुकीची म्हणतात; परंतु आपल्या म्हणण्यास कांहींच आधार देत नाहींत.

‡ गंगाबाई ही कर्नाटक प्रांतीं नाथांच्या एका जुन्या सोयऱ्याच्या घरीं दिलेली होती व तिला पुंडाजी नांवाचा एक मुलगा झालेला होता; अशी माहिती एकनाथांचे चरित्रकार महिपति व केशव हे देतात. हे दोन्ही चरित्रलेखक एकनाथांनंतर दोन शतकांनीं होऊन गेले.

§ तो चिंतामणिभूदेवकुमर। श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर। श्रोतयां विनवी मुक्तेश्वर। क्षमा किजे समस्तीं ॥ आदि. ५०।२१४. गोदावरीतटनिवासी। अत्रि गोत्री पवित्र ऋषि। चिंतामणि गुणैकराशी—। पासाव जन्म जयाचा. ॥ सभा. १७।७.

ग्रास दिली होती व याच दांपत्याला मुक्तेश्वर हा ' गुंडा पुत्र ' लाभला. रा. वि० का० राजवाडे यांनीं ग्रंथमालेंत मुक्तेश्वरांचे वंशज तेरवाडचे इनामदार यांच्या इ. स. १७२८ व इ. स. १७५९ सालच्या दोन सनदा प्रसिद्ध केलेल्या आहेत. त्यांत मुक्तेश्वर हे एकनाथस्वामींची कन्या गंगाबाई हिचे पुत्र,+असें म्हटलें आहे. येथें ज्या अर्थीं मुलीच्या नांवाचा बापाच्या नांवाशीं जोडून उल्लेख केला आहे व चिंतामणि हे नाथांचे घरजांवई असल्याबद्दल प्रसिद्धि आहे, त्या अर्थीं सनदेंतील गंगाबाई हें मुक्तेश्वरांच्या मातुःश्रीचें माहेरचेंच नांव असण्याचा संभव फार आहे. परंतु चिंतामणीच्या पत्नीचें माहेरचें नांव गोदावरी होतें, असें महिपति व केशव हे आपल्या एकनाथचरित्रांत स्पष्टपणें नमूद करितात, व नाथांना गंगा नांवाची दुसरी मुलगी होती, असेंही सांगतात. तेव्हां गोदूबाई व गंगाबाई या मुलींच्या नांवांची उलटापालट झाली आहे कीं काय, अशी शंका येते. गंगाबाई हें गोदूबाईचें सासरचें नांव कल्पून रा. राजवाड्यांनीं या गोष्टीचा मेळ घातला आहे. मुक्तेश्वर आपल्या आईच्या नांवासंबंधानें कोठेंही ब्रसुद्धां काढीत नाहींत; नाहींतर, हें कोडें निःसंदेह सुटलें असतें.

## २ मुक्तेश्वर नांवाची मूळपीठिका.

मुक्तेश्वरांचें ' मुक्तेश्वर ' हें नांव आईबापांनीं ठेविलेलें दिसत नाहीं. त्यांचें मूळचें नांव ' मुद्गल ' होतें, असें त्यांच्या दोन ठिकाणच्या उद्गारांवरून दिसून येतेंः—

**( अ ) गोदावरीतटनिवासी । अत्रि गोत्री पवित्र ऋषि ।**
**चिंतामणि गुणैकराशी । पासाव जन्म जयाचा ॥ ७६ ॥**
**तो मुद्गल चिंतामणिसुत— । लीलाविश्वंभरविख्यात ।**
**व्यासभारतीचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥ ७७ ॥**

सभा. अ. १७.

**( अ ) सुचिरसहजवासें गौतमीच्या तटाकीं ।**
**अतुट भजनपंथें पंथ टाकीत टाकी ॥**
**द्विजवर कवि नामा मुद्गल् अत्रिगोत्री ।**
**विमल वचनमुक्तें लववी संतश्रोत्रीं ॥**

मुक्तेश्वरी रामायण, युद्धकांड ४००.

+ " थोरले मुक्तेश्वर गोसावी हे श्रीएकनाथ स्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र यांचें वृंदावन मौजे तेरवाड येथें आहे." असे बखरींतील शब्द आहेत.

' *मुद्गल ' हें मुक्तेश्वरांचें आडनांव असावें, असें रा. राजवाडे म्हणतात. परंतु आमच्या मराठी कवींची आडनांव देण्याची वहिवाट दिसून येत नाहीं; ते बहुतकरून आपलें गोत्र, आपलें स्वतःचें नांव, व फार तर बापाचें नांव, नमूद करितात; व या नियमास मुक्तेश्वर अपवाद होते, असें मानण्यास कांहीं कारण दिसत नाहीं. शिवाय, ' मुद्गल ' हें आडनांव घेतल्यास वरील उताऱ्यांचा, विशेषतः सभापर्वांतील ओव्यांचा, समाधानकारक अर्थ लागूं शकत नाहीं. मुक्तेश्वरांनीं आपलें भारत रचण्याच्या वेळीं आपल्या गुरूच्या आज्ञेनें, आपलें आराध्य दैवत जें अवधूत दत्तात्रेय, त्याचें ' मुक्तेश्वर ' हें नांव धारण केलें, व तेंच त्यांच्या लोकप्रिय भारती पर्वांत सर्वत्र आढळत असल्यामुळें, त्यांच्या मूळ नांवाचा लोप होऊन, ते ' मुक्तेश्वर ' या नांवानें महाराष्ट्रीयांच्या परिचयाचे झाले, व तेंच नांव त्यांच्या–मुक्तेश्वरांच्या–वंशजांसही पूज्य अभिमानस्थान होऊन, बसलें. ' मुक्तेश्वर अवधूताच्या नांवनें मराठी भारत विस्तारावें,' अशी ज्या प्रसंगीं गुरूची अनुज्ञा झाली, तो प्रसंग मुक्तेश्वर आदिपर्वांत आरंभींच असा वर्णितातः—

**हो का डोळस पायाळ निका । परी गुरुआज्ञेचें अंजन देखा ।**
**प्रसन्नतेची भाग्यरेखा । नसतां निधान कैं जोडे ? ॥ ४० ॥**
**म्हणोनि देवतारूपें वाहिला । एक गुरूचि म्यां स्तविला ।**
**अभेद भक्तीनाचि भुलला । आज्ञापीत निजमुखें. ॥ ४१ ॥**
**त्या कारुण्यवसंतवातें । मूढमानसशुष्कलतें ।**
**स्फूर्तीचे पल्लव फुटले, तेथें । कवित्व फळें फळभारें. ॥ ४२ ॥**
**म्हणे, " बाळकें घेतला थाया । तो साच करुनी दाखवी माया ।**
**तेवीं त्वां आदरिलें, वायां । केवीं आम्हां दवडणें ? ॥ ४३ ॥**
**मुक्तेश्वर जो अवधूत । [ त्या ] माझेनि नांवें मुद्रांकित ।**
**कथा विस्तारीं भारत । महाराष्ट्रपदबंधी ॥ ४४ ॥**
**मूळ भारत व्यास सांगे । गणेश आपण लिही वेगें ।**
**येथें मी कर्ता नव्हे आंगें । म्हणोनी संतप्रार्थना त्वां किजे ॥ ४५ ॥**
**जो मी परब्रह्म नातळें व्यक्तीं । ते संत माझिया उत्साहमूर्ती ।**
**त्यांसी जे अनन्य शरण हाती । त्यांसी कैवल्य खेळणें ॥ ४६ ॥**

..............................................................

* मुद्गल हें आडनांव आमच्या ऐकण्यांत नाहीं; परंतु तें व्यक्तीचें नांव असल्याचें सुप्रसिद्ध आहे.

**ऐसिया संताचे जे दास । ते इंद्रचंद्रांचे ईश ।**
**त्यांच्या प्रसादें सावकाश । ऋद्धिसिद्धि वोळंगती " ॥ ५७ ॥**
**ऐसें वाक्य होतांक्षणीं । जे जे संत इहीं लक्षणीं ।**
**असती त्यांतें लोटांगणीं । दंडवत माझें पावो ॥ ५८ ॥**

यापुढें आदिपर्वांतच मुक्तेश्वर म्हणतात--

**( अ ) इति श्रीभारत आदिपर्वणि । कवि मुक्तेश्वर शूलपाणी ।**
**त्याचेनि प्रसादें हे वाणी । सुखी करो श्रोतयां ॥ १८७ ॥ अ. ४**
**( आ ) परेश लीलाविश्वंभर । मुक्तपाणी मुक्तेश्वर ।**
**वदला तेथें प्रेमादर । सज्जनीं केला पाहिजे ॥ ८८ ॥ अ. २१**
**( इ ) इति आदिपर्वणि भारती । मुक्तेश्वर अवधूत मूर्ती ।**
**तत्प्रसादें श्रोतयांप्रती । कविकिंकर अनुवादे ॥ १२८ ॥ अ. १३**

या उताऱ्यांवरून आमच्या कवीनें ' मुक्तेश्वर ' हें आपल्या आराध्य देवतेचें नांव धारण केलें, हें उघड आहे.

## ३ जन्म व जन्मस्थान.

मुक्तेश्वरांचा जन्म पैठणास इ. स.+ १६०९ त झाला, व त्यांना त्या पुराण-प्रसिद्ध पुण्यक्षेत्राचा मोठा अभिमान होता. महाराष्ट्र म्हणजे सर्व राष्ट्रांचें नाक व त्यांत सर्वत्र सदाचारभंग होऊन अधर्म बोकळला असतां, प्रतिष्ठान म्हणजे केवळ धर्माचें आश्रयस्थान झालें होतें, अशी मुक्तेश्वरांची भावना होती:--

**महाराष्ट्र जें सर्व राष्ट्रांस राजे । जयाच्या भयें व्यापिले देव लाजे ॥**
**सदाचारभंगें पळाली प्रतिष्ठा । प्रतिष्ठान त्या 'नाभि' कारीत निष्ठा ॥**

--रामायण, युद्ध. ४६९.

## ४ कुलदैवतें व गुरुसंप्रदाय.

कोल्हापुरची अंबाबाई व सोनारीचा बहिरोबा हीं मुक्तेश्वरांचीं *कुलदैवतें. या दोन्ही दैवतांचा मुक्तेश्वरांनीं वारंवार मोठ्या भक्तिभावानें निर्देश केलेला आहे, व

---

+ कोंडतकर अत्र्यांच्या दप्तरांत व सरंजाम्यांच्या जंत्रींत मुक्तेश्वरांचा जन्म शके १५३१ ( इ. स. १६०९ ) मध्यें झाला अशी माहिती लेखी आहे. ( भावेकृत महाराष्ट्र-सारस्वत, आवृत्ति ३, पृ. २८५ ).

० हें गांव जी. आय. पी. रेल्वेच्या केम स्टेशनाजवळ आहे.

* आदि. ५०।११५, सभा. १।२-५ व वन. १।३ पहा.

त्यांच्यावर त्यांनीं दोन अत्यंत मधुर† आरत्याही रचलेल्या आहेत. साधारण कर्मनिष्ठ गृहस्थाप्रमाणें आपले कुळधर्म यथास्थित रीतीनें पाळण्याचा मुक्तेश्वरांचा मोठा कटाक्ष होता, असें दिसतें; कारण, ते बहिरोबाच्या आरतींत शेवटीं म्हणतातः— 'इच्छित देशी दासा, जो जो जें कामी । मुक्तेश्वरीं हेतू निश्चळ कुळधर्मीं. ॥' जरी मुक्तेश्वरांचीं कुलदैवतें अंबाबाई व बहिरोबा हीं होतीं, तरी तीं त्यांचीं गुरूपदेशानें आराध्य दैवतें झालेलीं नव्हतीं. मुक्तेश्वरांचें आराध्य दैवत 'दत्त' हें होय. दत्त हा मुख्यतः शंकराचा अवतार, असें मुक्तेश्वर मानितात, तरीपण इतर देवता व दत्त यांमध्यें ते तात्त्विकदृष्ट्या भेद करीत नाहींत. मुक्तेश्वरांनीं आपली‡ दत्तभक्ति पुष्कळ स्थळीं व्यक्त केली आहे, व त्यांनीं स्वीकारिलेलें 'मुक्तेश्वर' हें टोपणनांवही शंकरांश दत्ताचेंच आहे, हें वर सांगण्यांतच आलें आहे. तसेंच, आपला गुरु 'विश्वंभर' किंवा 'लीलाविश्वंभर' यास दत्तावतार समजून किंवा त्याचा दत्ताशीं अभेद कल्पून, त्यास एकनिष्ठेनें नमन केल्याचा, त्याची कृपा याचिल्याचा, किंवा त्यास ग्रंथ अर्पण केल्याचा, उल्लेख मुक्तेश्वरी ग्रंथांत असंख्य वेळां दिसून येईल. तसेंच, दत्ताला किंवा गुरूलाच विश्वरूप व परमात्मा कल्पून मुक्तेश्वरांनीं वारंवार नमन केलेलें आहे. हल्लींप्रमाणेंच मुक्तेश्वरांचे वेळींही पंचायतनपूजेचा प्रचार जारीनें चालू होता. परंतु 'दत्त किंवा विश्वंभर हेंच माझें पंचायतन' असें मुक्तेश्वर म्हणतातः—

**( १ ) ॐ नमो जी विश्वंभरा स्वामी । तुझिये स्वस्वरूपीं ब्रह्मीं ।**
**पंचायतन पंच नामीं । कल्पिजेती अवयव. ॥ १ ॥**
**तेथें शिव तो निज मस्तक । विष्णुसूर्य द्वय हस्तक ।**
**सव्य चरण विनायक । वाम तो शक्ति साजरा. ॥ २ ॥**
**याचा हाची अभिप्रावो । वस्तूवीण दुसरें वावो ।**
**जेथें नमन एका स्वभावो । जाणिजे तें निजबीज. ॥ ३ ॥**

—आदि. १.

**( २ ) ॐ नमो विश्वंभरा देवा । अभेद भावें तुझी सेवा ।**
**तूंच विश्वासरसी जीवा । प्रतीति बाणे निर्धारें. ॥ १ ॥**
**हरि हर सूर्य गणेश शक्ति । तूंची एक बहुधा व्यक्ति ।**

† या काव्यसंग्रहग्रंथमालेंत मुक्तेश्वरी स्फुट काव्यांत छापल्या आहेत.

‡ आदि ४।१८७, ८।९१, ११।१७०, २९।१७२, ३८।१०७, ५०।११४; सभा. १।६-९, ८।१६८.

जेथें धांवे मनोवृत्ति। तेथें तूं एकू ॥ २ ॥ —वन. १०

( ३ ) लीलाविश्वंभर ईश्वरू। दत्तात्रेय जगद्गुरू।
ज्याचेनि नामें भवसागरू। मागां तरले असंख्य ॥ ६ ॥
ज्याची कृपादृष्टी भगवती। अनुग्रह तोचि गणाधिपति।
बोधप्रकाश गभस्ती। हृदयाकाशीं झळकत. ॥ ८ ॥
जीवीं शिवत्व प्रकाशिलें। विष्णुमयचि विश्व केलें।
एवं पंचायतन भलें। म्यां देखिलें गुरुरूपीं. ॥ ९ ॥—सभा. १

तेव्हां गुरूपदेश झाल्यावर मुक्तेश्वर दत्तसांप्रदायी झाले, हें जरी उघड आहे, तरी त्यांना कोणत्याही पंथाचा दुराग्रहपूर्वक अभिमान किंवा हट्ट होता, असें नाहीं. सर्व पंथ *सारखेच; वैष्णव, शैव, शाक्त, इत्यादिकांची परस्परासहिष्णुता अश्लाध्य होय; परमात्मा एकच आहे, त्याला वाटेल त्या नांवानें संबोधा, त्यास कांहीं हरकत नाहीं, असें मुक्तेश्वरांचें स्पष्ट वचन आहे:—

( १ ) जो श्रेष्ठ बोलिजे श्रेष्ठीं। तो बैसोनी मायादेवीचे पाटीं।
ब्रह्मा, विष्णु, महेश, पोटीं। जन्मविलीं बाळकें. ॥ १ ॥
कवतुकार्थ ठेवुनी नांवें। रंजवी साकारतेच्या भावें।
अव्यक्तपालखीं स्वभावें। थापडोनि पहुडवी. ॥ २ ॥
तया आदिपुरुषा स्वामी। लीलाविश्वंभरगुरुनामीं।
नमस्करोनी मनोधर्मीं। सावध म्हणे श्रोतयां. ॥ ३ ॥
—विराटपर्व. १.

( २ ) जयातें* बोलती परमात्मा। विष्णु शंकर अथवा ब्रह्मा।
जो असेल तयाची प्रतिमा। व्यक्ताव्यक्त नमियेली ॥ १ ॥
सभा. १.

आपल्या संप्रदायमताचा फाजील अभिमान बाळगून, इतर संप्रदायांतील पूज्यापूज्यांचा उपमर्द करणें, किंवा दंभवृत्तीनें आपल्या संप्रदायाचा टेंभा मिरविणें, हें मुक्तेश्वरांना मुळींच रुचत नसे. ‘ सांप्रदायमताभिमानें। श्रेष्ठ अश्रेष्ठ मानीं मनें। अयोग्य योग्यतें पूजणें। तो एक मूर्ख ’ ( मूर्खांचीं लक्षणें, ७९ ).

* आदि. १।४–८

*या ओवींत ‘ नसे टावा ब्रह्मा, न शिव, अथवा श्रीपति हरि, ’ इत्यादि सुप्रसिद्ध वामनी श्लोकाचेंच प्रतिबिंब वटलेलें आहे.

## ५ जन्मशक.

मुक्तेश्वरांचा जन्मशक, शा. शके १५३१ म्हणजे इ. स. १६०९ हा सर्वत्र मानितात, व तो चुकीचा आहे. असें मानण्याला कांहीं आधार आहेसें दिसत नाहीं. एकनाथस्वामींचा समाधिशक शा. श. १५२१ किंवा इ. स. १५९९ आहे हें रा. ल० रा० पांगारकर यांनीं भरपूर पुराव्यानें 'महाभारताचे मराठी अवतार' या लेखांत सिद्ध केलें *आहे. तेव्हां वरील जन्मशक जमेस धरितां, मुक्तेश्वर एकनाथांच्या हयातींत जन्मले नसून, त्यांच्या समाधिकालानंतर दहा वर्षांनीं जन्मले, हें हिशोबानेंच सिद्ध होतें. रा. राजवाडे यांनींही ग्रंथमालेंत मुक्तेश्वरांविषयीं कालचर्चात्मक लेख लिहिला आहे. त्यांत त्यांनीं मुक्तेश्वरांच्या भारती पर्वांचें आलोडन करून, अंतः-प्रमाणांच्या आधारांवर, मुक्तेश्वरांनीं आपलें भारत इ. स. १६५० च्या पूर्वी लिहिलें, असा †निर्णय काढिला आहे. तसेंच मुक्तेश्वर हे इ. स. १६६० च्या नंतर लवकरच वारले असावे, असे धरून चालून व ते इ. स. १६०९ त जन्मले, असें समजून, रा. राजवाड्यांनीं मुक्तेश्वर मृत्युसमयीं पन्नाशीच्या घरांत होते, असा सुमार काढिला‡आहे. परंतु रा. पांगारकर म्हणतात, कीं, 'मुक्तेश्वर एकनाथांच्या वृद्धपणीं कुमारावस्थेत होता, व त्यानें आपलें बालपण नाथांच्या संगतींत व शिक्षणाखालीं घालविलें.' परंतु हें केवळ पैठणच्या कारभाऱ्यांजवळून मिळालेल्या तोंडी माहितीवरून रा. पांगारकरांनीं केलेलें एक विधान आहे, व याला त्यांनीं कांहीं अस्सल पुरावा दिलेला दिसत नाहीं. उलटपक्षीं, मुक्तेश्वरांच्या प्रचलित जन्मशकाचा (इ० स० १६०९) आधार घेऊन, 'इ० १५९९ मध्यें समाधिस्थ झालेल्या नाथांच्या हयातींत ज्यांचा जन्मच झाला नव्हता,' त्या मुक्तेश्वरांविषयींचें रा. पांगारकरांचें वरील विधान शशशृंगाप्रमाणें किंवा वंध्यासुताप्रमाणें आहे असें म्हटल्यास, रा. पांगारकरांकडून काय बरें जबाब येईल? मुक्तेश्वरांची एकनाथांच्या ठिकाणीं अत्यंत निष्ठा व आदरभक्ति होती. त्यांनीं नाथांवर रचलेलें एक पद व दोन आरत्या काव्यसंग्रहांत

---

*रा. पांगारकर म्हणतातः—"एकनाथस्वामींचा समाधिशक १५३१ म्हणून सर्वत्र समजतात, पण पैठणास नाथांच्या बाहेरच्या समाधीवर खालील श्लोक लिहिला आहेः—शालीवाहन पंधराशत शकीं एकागळें विंशती। वर्षा नाम विकारि, मास बरवा फाल्गून वद्यापृती॥ षष्ठी, वासरभानु, त्या शुभदिनीं निर्याण स्वच्छंदता। पावे श्रीगुरु एकनाथाचि पहा सायुजसाम्राज्यता.॥ पैठणास नाथांचें एक स्तोत्र म्हणतात, त्यांतही शके १५२१ हाच शक दिला आहे, त्या पक्षीं हाच शक बरोबर मानून चालणें योग्य दिसतें.

† रा. राजवाडेकृत 'मुक्तेश्वर' पृ० ६–१३.

‡ रा. राजवाडेकृत 'मुक्तेश्वर' पृष्ठ ४–५, कलमें ६–७.

प्रसिद्ध झालेल्या आहेत, व त्यांत भक्ति व प्रेम हीं ठळकपणें बिंबलेलीं आहेत. परंतु या भक्तिभावाला व प्रेमाला मुक्तेश्वरांना नाथांची प्रत्यक्ष संगतीच घडली होती, असें मानल्याशिवाय गंत्यतरच नाहीं, असें होत नाहीं. असें प्रेम व अशी भक्ति, सत्पुरुषांचे ग्रंथ वाचून, प्रेमळ, व सुशील मनांत उत्पन्न होणे अगदींच अशक्य नाहीं. तशांत, एकनाथ हे मुक्तेश्वरांचे आजोबा असल्यामुळें, वरील मनोवृत्तींना विशेष स्फुरण येणें साहजिक आहे, हेंही लक्ष्यांत घेतलें पाहिजे. ' *ज्ञानेश्वर एकनाथू। यांतें साष्टांग प्रणिपातू। गुरुस्वरूप म्हणोनी हेतू। ग्रंथारभीं वंदावया ॥ ' या ओवीवरून एकनाथ हे मुक्तेश्वरांचें प्रत्यक्ष गुरु होते, असें निर्णीत करण्याचा कोणी प्रयत्न करितील; परंतु येथील ' गुरुस्वरूप ' हा शब्द व ज्ञानेश्वर आणि एकनाथ यांची एकत्र केलेली सांगड, या बाबी लक्षांत घेतल्या, म्हणजे वरील निर्णयाचें मृगजळत्व तत्काळ प्रतीत होईल. मुक्तेश्वरांनीं एकनाथांवर रचलेल्या दोन आरत्या प्रसिद्ध आहेत म्हणून वर लिहिलें आहे. त्यांपैकीं एका आरतींत पुढील कडवें आढळतें:—कोणे मुक्याहातीं रामायण वदवी ?। समुद्रवलयांकित श्री कोणाची झाली ?। ऐसा अगम्य महिमा जाणति अनुभवी। भावें मुक्तेश्वर वांछित पदपदवी. ॥ ६ ॥ या कडव्यांतील पहिल्या चरणाचा संबंध प्रत्यक्ष मुक्तेश्वरांशीं लावून, मुक्तेश्वर हे नाथांच्या हयातींत जन्मले, एवढेंच नव्हे, तर ते प्रथम मुके होते व मग नाथांच्या कृपाकटाक्षानें बोलके झाले व मुक्तेश्वरांनीं त्यांच्याच सांगण्यावरून आपलें पहिलें काव्य—रामायण—रचिलें, असें कांहीं मंडळी सिद्ध करूं पाहते, व ते या सिद्धान्ताला त्याच मजकुराच्या मुक्तेश्वरी दंतकथेची जोडही देतात. ‡निबंधचंद्रिकाकार व महाराष्ट्रसारस्वतकार हे, ही दंतकथा अद्भुतत्व व कालविपर्यास या दोषांनीं व्याप्त म्हणून टाकाऊ ठरवितात, व ' मुक्तेश्वरांना नाथांच्या ग्रंथांपासून ज्ञान प्राप्त झालें, व त्यांची काव्यस्फूर्ति प्रज्वलित झाली, ' या गोष्टींत वरील दंतकथेचें बीज आहे, असें ते समजतात. आतां वरील दंतकथेंतील हकीकत जरी अद्भुत आहे, तरी ती खरी मानावी किंवा नाहीं, हा प्रश्न बाजूस ठेवून, ती खरीच आहे अशी

* ही ओवी वनपर्वाच्या पहिल्या अध्यायांतील चवथी आहे. या ओवीचा वरील पाठ, आमच्या जवळील हस्तलिखित प्रतींतील आहे. काव्यसंग्रहाचा पाट किंचित् निराळा आहे; तो असाः—मुक्तेश्वरें एकनाथु। यातें साष्टांग प्रणिपातु। गुरुस्वरूप म्हणोनि हेतु। ग्रंथारंभीं वंदावया. ॥ परंतु मुक्तेश्वरांनीं आदिपर्वांत ज्ञानेश्वर व एकनाथ या दोघांनाही असेंच लागोपाट नमन केले आहे. या गोष्टीचें आम्हीं स्वीकारलेल्या पाटाला विशेष पाटबळ आहे.

‡ निबंधचंद्रिका, अंक ४०, पृष्ठ ३–५ पहा. रा. भावेकृत महाराष्ट्रसारस्वत, आवृत्ति पहिली. पृष्ठ ४० पहा.

कल्पना करून चालें; कारण, हा चमत्कार घडून आला होता, असें मुक्तेश्वर मनःपूर्वक‡ मानीत होते, हें वर दिलेल्या आरतींतील उताऱ्यावरून सिद्ध आहे. आतां त्या उताऱ्याचा संबंध प्रत्यक्ष मुक्तेश्वरांशींच लावणें जरूर आहे कीं काय, एवढाच प्रश्न उरतो. मुक्तेश्वरांनीं आरतींत जे शब्द योजिले आहेत, त्यांवरून त्या गोष्टीचा खुद्द मुक्तेश्वरांशीं धागा जोडणें आवश्यक दिसत नाहीं. आम्हांला असें वाटतें, कीं, या ठिकाणीं मुक्तेश्वरांचा कटाक्ष दुसऱ्याच एका व्यक्तीसंबंधाच्या आख्यायिकेवर आहे, व ती आख्यायिका कालविपर्यासाविषयीं बहुतेक बेफिकीर असणाऱ्या महाराष्ट्रीयांनीं आपल्याशीं दृढ परिचित अशा नाथांच्या नातवाच्या—मुक्तेश्वरांच्या—नांवावर लादून दिलेली आहे. अशा रीतीनें आख्यायिकांची नसत्याच व्यक्तींवर लाटालाटी व लादालादी झालेली अनेक वेळां अनेक लेखकांनीं सिद्ध केलेली आहे. असो. एकनाथांचा ' गावबा ' नांवाचा एक पट्ट शिष्य होता. हा मूळचा मुका असून, त्यास नाथांच्या अनुग्रहानें वाचा आली, अशी दंतकथा आहे. पुढें नाथ भावार्थरामायणाची रचना करीत असतां, तो ग्रंथ युद्धकांडाच्या चव्वेचाळीसाव्या अध्यायावर येऊन थडकला. तेव्हां नाथांना थकवा भासूं लागला होता, व त्यांची प्रकृति नाजूक व हलकी झाली होती. त्यामुळें हा ग्रंथ आपल्या हातून पूर्णपणें तडीस जाईल, असा भरंवसा त्यांस येईना. म्हणून, तो ग्रंथ पुढें चालविण्याची व संपूर्ण करण्याची कामगिरी त्यांनीं आपला पट्ट शिष्य जो गावबा, त्याजवर सोंपविली व गावबानेंही ती गुरूच्या कृपानुग्रहाच्या जोरावर यथास्थितपणें पार पाडिली. तेव्हां एकनाथविषयक मुक्तेश्वरी आरतींतील वरील चरणाचा संबंध गावबाच्या हकीकतीशीं सुसंगतपणें जुळणार आहे, व असा तो जुळविण्यास कांहीं अडचण असलसें दिसत नाहीं. परंतु त्यांत मुक्तेश्वरांनीं स्वतःचाच उल्लेख केला आहे, असें म्हटलें, तर मात्र कित्येक अडचणी व शंका उद्भवणार आहेत. मूळची वाक्शक्तीची उणीव असतां, ती एकाद्याच्या प्रसादानें दूर होऊन वाचा फुटणें, ही गोष्ट कांहीं सामान्य महत्वाची

‡ मोरोपंत कवीही ही अद्भुत कथा खरी मानीत होते व मुक्तेश्वरांना लीलाविश्वंभराच्या प्रसादानें वाणी फुटली, असें त्यांनीं आपल्या सन्मणिमालेंत सुचविलें आहे. परंतु ते त्यांत एकनाथाचा संबंध मुळींच आणीत नाहींत व मुक्तेश्वरी रामायणाचाही उल्लेख करीत नाहींत, हें लक्ष्यांत घेतलें पाहिजे.—श्रीलीलाविश्वंभरपदनति हेतु ध्रुवाचि यागला। स्पर्शें शिष्या यत्कर, जेविं हरिदर ध्रुवाचिया गाला. ॥ ( सन्मणिमाला ३३. ) येथें हेंही सुचवून टेविलें पाहिजे कीं, या गीतीवरून ' लीलाविश्वंभराशिष्य ' साफ मुका होता, असें पंत मानितात, असें होत नाहीं, तर तो ध्रुवाप्रमाणें अजाण व अस्फुटवाक् होता, इतकेंच त्यांचें म्हणणें आहे.

नाहीं; तशांत कवीच्या चरित्रांततर ही क्रांति आत्यंतिक महत्वाची आहे, हें उघड आहे. तर मग ज्या नाथांच्याच कृपानुग्रहानें ही क्रांति मुक्तेश्वरांच्या चरित्रांत घडून आली असें मानावयाचें व या नवीन प्राप्त झालेल्या वाक्शक्तीचा प्रथम उपयोग ज्या नाथांच्याच आज्ञेनें त्यांनीं ' कौतूहलरामायणाच्या ' रचनेंत केला असें गृहीत धरावयाचें, त्या रामायणांत मुक्तेश्वरांनीं या गोष्टीचा उल्लेख करूं नये, एकनाथांस नुस्तें नमनही करूं नये, त्यांचा कोणत्याही प्रकारें नामनिर्देशही करूं नये, हें मानवी स्वभावाशीं सामान्यतः सुसंगत आहे काय ? रामायणांतील युद्धकांडाच्या अखेरीस मुक्तेश्वरांनीं आपलें जन्मठिकाण, कुळगोत, नांव, यांचा स्पष्ट उल्लेख केला आहे, परंतु तेथें त्यांस नाथांचा उल्लेख करण्याची बुद्धि झालेली नाहीं; किंबहुना त्यांनीं आपल्या रामायणांत नाथांसंबंधानें कोठेंही ब्रसुद्धां काढलेला नाहीं. यावरून सरळ अनुमान हेंच निघतें, कीं, नाथांच्या कृपेनें मुक्तेश्वरांस वाणीचा लाभ झालेला नाहीं, व रामायण रचण्याच्या स्फूर्तीचा उगमही नाथांकडून झालेला नाहीं. या सर्व गोष्टींचा विचार केला असतां, मुक्तेश्वर हे नाथांच्या हयातींत जन्मून, त्यांच्या वृद्धपणीं कुमारावस्थेंत होते, असें स्पष्ट आधारावांचून मानण्याचें प्रयोजन नाहीं, व उपलब्ध माहितीशीं मुक्तेश्वरांचा इ० स० १६०९ हा जन्मशक कोणत्याही प्रकारें विसंवादी होत नाहीं.*

## ६ गुरु.

मुक्तेश्वरांच्या गुरूचें नांव ' विश्वंभर ' होतें, व त्याला ते वारंवार ' लीलाविश्वंभर ' या नांवानेंही संबोधितात. मुक्तेश्वर आपल्या गुरूला शिवस्वरूप किंवा दत्तस्वरूप समजतात, आणि वारंवार गुरूला दत्ताच्या नांवानें, तर दत्ताला गुरूच्या नांवानें, उद्देशून वर्णन केलेलें त्यांच्या ग्रंथांत आढळतें. अशीं स्थळें अनेक आहेत. मुक्तेश्वरी भारताच्या उपलब्ध असलेल्या चारी पर्वांतील एकंदरपैकीं एकतृतीयांश अध्यायांत ' लीलाविश्वंभर ' किंवा ' विश्वंभर ' हें गुरुनाम आढळतें. बाकीच्या दोनतृतीयांश अध्यायांत कोठें दत्ताचें स्मरण आढळतें, तर कोठें नुसतेंच ' मुक्तेश्वर ' हें नांव आढळांत येतें. मुक्तेश्वराचें मूळचें नांव ' मुद्गल ' होतें, हें वर दाखविण्यांत आलेंच आहे. मुक्तेश्वरांनीं गुरूपदेश घेतल्यावर ते दत्तसांप्रदायी झाले, व गुरूच्या आज्ञेनेंच भारतरचनेच्या वेळीं आपल्या सांप्रदायानुरूप त्यांनीं आपल्या आराध्यदेवतेचें ' मुक्तेश्वर ' हें नाव ग्रहण केलें. तेव्हां ' मुक्तेश्वर ' हें नांव एकाद्या प्रकरणाच्या

* या निर्णयाला अनुकूल असा कोडिनकर अत्र्यांच्या दप्तरांत व सरंजाम्यांच्या जंत्रींत लेखी पुरावा अलीकडे उपलब्ध झाल्याचें मागें पृ० ४ वर नमूद केलेंच आहे.

किंवा अध्यायाच्या शेवटीं घालणें हेंही गुरुभक्तीचें व दत्तभक्तीचें लक्षण समजणें भाग आहे.

## ७ पहिलें काव्य.

विश्वंभराला आपला गुरू करण्यापूर्वी व दत्तसंप्रदायांत शिरण्यापूर्वी, मुक्तेश्वरांनीं आपल्या रामायणाची रचना केली होती. प्रथम त्यांचा युद्धकांडाच्या अखेरपर्यंत—म्हणजे उत्तरकांड वगळून सहाच कांडांवर—रचना करण्याचा संकल्प होता. त्याप्रमाणें त्यांनीं ग्रंथ पुरा करून त्यास ' संक्षेपरामायण ' असें अभिधान दिलें. या संबंधानें युद्धकांडांतील शेवटचे उपसंहाराचे श्लोक फार महत्वाचे आहेत, त्यांतील दोन तीन मुद्याचे श्लोक येथें उतरून घेतोः—

**संक्षेपरामायण ' नाम यातें । संक्षेपता ये श्रवणें भवातें ॥**
**काशीनिवासी जनतापहारी । तारी जगा केवळ नामधारी ॥४६६॥**
**जिहीं सादरें शेवटा ग्रंथ नेला । मतीहीन तो आदरें थोर केला ॥**
**गुणी तोषले सार पीयूषपानीं । तिहीं गाळिले दोष निःसार पाणी ॥ ४६८ ॥**

यानंतर दोन श्लोकांत आपली जन्मभूमि, कुलगोत, व नांव, हीं सांगून अखेर पांच श्लोकांत रामनामाचा महिमा गाइलेला आहे. एकंदरींत हा ग्रंथ येथेंच पुरा झाला आहे, हें यावरून स्पष्ट ठरतें. या ठिकाणीं किंवा या पूर्वींच्या पांचही कांडांत कवीनें आपल्या गुरूचें, विश्वंभराचें, किंवा दत्ताचें, कोठेंही नांव काढिलें नाहीं. मुक्तेश्वर हें नांवही या सहा कांडांत नसून, सहाव्या कांडाच्या अखेर ' मुद्गल ' हें नांव दाखल केलेलें आढळतें. याला फक्त एकच अपवाद आहे, व तो काव्यारंभींचा संस्कृत श्लोक होय. तो श्लोक हाः—

**श्रीमद्रामपदाम्बुजे हृदि सदा ध्यातुर्भवाब्धेर्भिया ।**
**मुक्तेशस्य विराजते सुरुचिरा वाणी गुणग्राहिणी ॥**
**नानानाटकभावपद्यरचनासंदोहसान्द्रीकृता ।**
**सुश्राव्या सुजनैर्मनोहरतरा संसारदुःखापहा ॥**

या श्लोकांत द्वितीय चरणांत 'मुक्तेश' हें नांव आलेलें आहे व तें कवीचें नांव आहे, यांत संदेह नाहीं. परंतु हा श्लोक मुक्तेश्वरांचा स्वतःचा नव्हे, अशी आमच्या मनाला खात्री वाटते. यांत मुक्तेश्वरांच्या वाणीची व विद्वत्तेची जी प्रौढी गाइलेली

आहे, ती कोणीतरी त्यांच्या भक्तानें गाइलेली आहे, कवीनें स्वतःच आपला पोवाडा खास म्हटलेला नव्हे. कारण, काव्याच्या आरंभींच---मंगलाचरणाच्याहीपूर्वी-असली आढ्यता मिरविण्याइतकी मुक्तेश्वरांच्या ठिकाणीं उल्लूपणाची फुगवटी होती, असें आमचें मन घेत नाहीं. मुक्तेश्वरांची व सामान्यतः इतर सर्व मराठी कवींची रीति म्हटली म्हणजे ग्रंथारंभीं मंगलाचरण करावयाचें; नंतर विषयानुरोधानें प्रसंग असल्यास प्राकृताचा अभिमान दर्शवावयाचा; ग्रंथाच्या अखेरीस किंवा एकादे वेळेस मध्येंही संधी पाहून आपल्या वाणीची तरफदारी करावयाची, व अखेर ग्रंथ गुरुचरणीं किंवा ईशचरणीं वाहावयाचा. हा एकंदरींत साधा, सभ्य, व भक्तिविनयादिभावनांशीं अविसंगत, प्रकार होय. तर मग येथें मुक्तेश्वरांनीं काव्य–व बहुधा आपलें पहिलेंच मोठें काव्य—रचावयास घेतलें, तों एकदम पहिल्या प्रथम आपल्याच तोंडाभोंवतीं दिवा ओंवाळण्यास सुरवात केली, व तो सोहाळा आटोपून मग राम, गणपती, सरस्वती, इत्यादिकांचा प्रवेश रंगणावर होऊं दिला, हें मानावें तरी कसें ? तसेंच एकंदर काव्य मराठी असून, आरंभींच हे तीन श्लोक संस्कृतांत असणें, हेंही मुक्तेश्वरांच्या पद्धतीला जुळून नाहीं. तेव्हां, सर्व गोष्टींचा विचार करितां, आरंभींचे तिन्ही श्लोक---विशेषतः पहिला मुक्तेश्वरांविषयीं प्रशस्तिपर श्लोक---मुक्तेशकृत नसून, ते त्यांच्या कोणी तरी भक्तानें लिहिले असावेत, असा निर्णय फलित होतो. या कारणास्तव हा पहिला श्लोक बाजूस ठेविला, म्हणजे रामायणाच्या पहिल्या सहा कांडांत कोठेंही 'मुक्तेश' किंवा 'मुक्तेश्वर' हें नांव आढळत नाहीं. या सहा कांडांपैकीं पहिल्या पांचांत प्रत्येक कांडाचे शेवटीं ' अमुक कांड समाप्त झालें ' असें स्पष्ट सांगितलें आहे, परंतु कवीचें नांव दिलेलें नाहीं. पण सहाव्या कांडाच्या अखेरीस पहावें, तों ' युद्धकांड संपलें ' असें न लिहितां, ग्रंथाचीच समाप्ति केली आहे, ग्रंथाचें नांव दिलें आहे. श्रोत्यांचे आभार मानिले आहेत, व कवीनें आपली जी माहिती दिली आहे, तींत ' मुद्गल ' हें नांव दाखल केलें आहे. तेव्हां मुक्तेश्वरांनीं विश्वंभरास गुरु करण्याच्या पूर्वी आपलें ' संक्षेपरामायण ' लिहिलें, विश्वंभराचा शिष्य बनल्यावर ते दत्तसांप्रदायी झाले, व मग त्यांनीं ' मुक्तेश्वर ' हें नांव धारण केलें, इतक्या गोष्टी सिद्ध होतात. परंतु रामायणाचें उत्तरकांड मात्र त्यांनीं गुरूपदेश घेतल्यावर रचिलेलें आहे, हें त्यांच्या उपसंहारावरून उघड होत आहे:—

**सकरुणगुरुदृष्टीं ग्रंथ संपूर्ण झाला ॥**
**अगुणसहित संतीं पाहिजे गोड केला ॥**

सुजनसमुह शंभू कोटिलिंगें न मोला ॥
परम भणग दीनें वाहिला बेलपाला ॥ १ ॥
विश्वंभर-श्रीगुरुच्या प्रसादें।
आनंदवाचा वदलों विनोदें ॥
भक्ती, न मुक्तेश्वर, सार बोले ॥
आकर्णितां सज्जनचित्त डोले ॥ २ ॥

## ८ मुक्तेश्वरांचे गुरु कोण ?

'विश्वंभर' किंवा 'लीलाविश्वंभर' हें मुक्तेश्वरांच्या गुरूचें नांव होतें, असें वर सांगितलेंच आहे. परंतु बऱ्याच चरित्रकारांचें असें मत आहे, कीं, मुक्तेश्वरांचे वडील चिंतोपंत हेच मुक्तेश्वरांचे गुरूही होते आणि 'विश्वंभर' हें चिंतोपंतांचेंच दुसरें टोपण नांव, व 'लीला' हें मुक्तेश्वरांच्या आईचें म्हणजे 'गोदूबाई' चें नांव होय. 'लीलाविश्वंभर' या शब्दांत मुक्तेश्वरांची अलोट मातृपितृभक्ति वठलेली आहे, असें या मंडळीस वाटतें, व कित्येकांनीं असेंही अनुमान बसविलें आहे, कीं, "केकावलीवर दादोबा पांडुरंगांनीं विस्तृत टीका करून, तिला आपल्या मातापितरांचे नांवानें यशोदापांडुरंगी' म्हटलें आहे; ही कल्पना त्यांना बहुधा मुक्तेश्वरांच्या लीलाविश्वंभर या पदावरूनच सुचली *असावी." पण काव्यसंग्रहकार जनार्दन बाळाजी मोडक यांना या गोष्टीबद्दल बराच संशय होता, असा सन्मणिमालेंतील + बत्तीस व तेहतीस या गीतींवरील टीपा पाहिल्या म्हणजे निश्चित सिद्धान्त काढितां येतो. 'लीलाविश्वंभर' हीं मुक्तेश्वरांची गुरुपत्नी व गुरु असून, तीं त्यांच्या मातापितरांहून भिन्न होतीं, अशी रा. मोडकांची समजूत होती.

---

* रा. पांगारकरकृत 'महाभारताचे मराठी अवतार,' पृष्ठ १०.

+ या दोन्ही गीति टीपांसह येथें उतरून घेतोंः—

श्रीमुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील।
वंदी लक्ष जयाचे, ज्याचें यश भव्य, जेविं मंदील ॥
श्रीलीलाविश्वंभरपदनति हेतु ध्रुवाचि यागाला।
स्पर्शे शिष्या यत्कर, जेविं हरिदर ध्रुवाचिया गाला ॥

( १३ ) याचें जन्म श० १५३१ त झालें. हा जातीचा आश्वलायन ब्राह्मण. याच्या बापाचें नांव चिंतामणि व आईचें गोदूबाई. ही एकनाथस्वामींची मुलगी होती. याचे भारतादि ओवीबद्ध ग्रंथ आहेत.

( १५ ) मुक्तेश्वराची गुरुपत्नी व गुरु.

आतां ' मुक्तेश्वरांच्या आईचें नांव लीला, या कल्पनेस आजपर्यंत कोणकोणते आधार सादर करण्यांत आले आहेत व त्यांत कितपत भरींवपणा आहे, याचा विचार करूं. ' भरतखंडाचा अर्वाचीन कोश ' याचे कर्ते रा. गोडबोले यांनीं पुढील आधार दिला आहेः-† " गरुडारूढ मधुसूदन । हृदयीं धरिला आपण । कंठीं सर्पाभरण नवल काय ? ॥ १ ॥ मस्तकीं चंद्र सुशीतल । त्याहीवरी गंगाजल । कंठीं धरिलें हळहळ ॥ नवल काय ? ॥ २ ॥ अहो लीलाविश्वंभरा । शंभो शिवहरा शंकरा । तारिसी मुक्तेश्वरा । नवल काय ? ॥ ३ ॥. " या तीन ओव्यांवरून मुक्तेश्वरांचें प्रिय दैवत शंकर होतें, असें म्हणावें लागेल, व दत्त हा शंकरांश मानिल्यामुळें यांत कांही विसंगतताही नाहीं. तसेंच इतर अनेक ठिकाणच्या उल्लेखांवरून ' विश्वंभर ' किंवा ' लीलाविश्वंभर ' हा मुक्तेश्वरांचा गुरु ठरत असल्यामुळें, व आपला गुरु केवळ दत्तस्वरूप किंवा शंकरस्वरूप होय, अशी भावना मुक्तेश्वरांच्या ठिकाणीं होती, हें मागें सिद्ध केलें असल्यामुळें, प्रस्तुतच्या ओव्यांत ' लीलाविश्वंभर ' पदानें कवीनें आपल्या गुरूचा उल्लेख ध्वनित केला आहे, असें म्हटल्यास कोणत्याही प्रकारें असंबद्धतेच्या आरोपास जागा दिली जाईल, असें म्हणावयास नको. परंतु या ओव्यांतून ' लीलाविश्वंभर ' हीं मुक्तेश्वरांच्या मातापितरांचीं नांवें होत, हा निष्कर्ष काढणें मात्र विचारशक्तीच्या पलीकडील आहे, असें आमच्या बुद्धीस दिसतें. वरील ओव्यांतून हें तत्त्व काढणें, म्हणजे गुळवेलीच्या कांड्यातून प्रवाळभस्म काढणेंच होय ! महाराष्ट्रसारस्वतकार म्हणतात* कीं, " यानें ( =मुक्तेश्वरानें ) आपला व आपल्या मातापितरांचा नामोल्लेख, ' तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात । व्यासभारतीचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥ " या व अशासारख्या शब्दांनीं आपल्या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं केला आहे. " आतां वरील ओवींतून ' लीलाविश्वंभर ' हीं मुक्तेश्वरांचीं मातापितरें होत, हा अर्थ काढणें केवळ हास्यास्पद होय. अर्थ करतांना वाक्यरचनेला जर कांहीं महत्व देणें असेल, तर वरील अर्थ निघणें संभवतें तरी कसें,

† या तीन ओव्या कोणत्या प्रकरणांतील आहेत, हें समजत नाहीं. मुक्तेश्वरांचें ' वत्सलाहरण ' नांवाचें एक खंडकाव्य असल्याचें रा. गोडबोले लिहितात. परंतु तें काव्य आमच्या पाहाण्यांत नाहीं; तेव्हां कदाचित् त्या काव्यांतील या ओव्या असतील, अशी कल्पना धांवते.

* रा. भावेकृत महाराष्ट्रसारस्वत. पृ. ४०. सारस्वताच्या नव्या म्हणजे तिसऱ्या आवृत्तींत हें विधान नाहीं, हें येथें निर्दिष्ट करणें अवश्य आहे.

हेंच मोठें कोडें आहे. ' चिंतामणिसुत ' म्हणजे मुक्तेश्वर म्हणावयाचें, तर मग ' लीलाविश्वंभरजगविख्यात ' याचा संबंध चिंतामणीशीं लागणें संभाव्य तरी आहे काय? या ओवींत ' चिंतामणि ' व ' लीलाविश्वंभर ' यांचें ऐक्य सिद्ध होणें बाजूसच राहून, उलट त्यांचें भिन्नत्वच गळीं उतरतें; कारण, जर या ओंवीचा कांहीं अर्थ झालाच, तर ' चिंतामणिसुत हाच लीलाविश्वंभर जगविख्यात' असा होईल. 'लीलाविश्वंभर गुरूच्या नांवानें अगर प्रसादानें लोक विश्रुत झालेला, चिंतामणीचा मुलगा मुद्गल हा व्यास भारतीचा अर्थ मराठींत बोलता झाला,' । असा या ओवीचा मतलब हस्तगत होतो. यांत ' चिंतामणि ' व ' लीलाविश्वंभर ' एकच होत, ही गोष्ट शोधूं पहाणें निरर्थक दिसतें. रा. पांगारकर व निबंधचंद्रिकाकार यांनीं ' तो चिंतामणिभूदेवकुमर । श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर । श्रोतयां विनवी मुक्तेश्वर । क्षमा कीजे समस्तीं ॥ ' ही ओवी दिली आहे, परंतु तिचा ' लीलाविश्वंभराशीं ' अर्थार्थी संबंध नाहीं. रा. पांगारकरांनीं आणखीही दोन पद्यांचा उल्लेख केला आहे, तीं हीं:–विश्वंभर श्रीगुरुच्या प्रसादें आनंदवाचा वदलों विनोदें. ॥ ( रामायण ) लीलाविश्वंभरगुरुचरणीं । पुष्पांजलीं वचनसुमनीं । मुक्तेश्वरें अर्पूनि मनीं । कृतकृत्यता मानिली ॥ ( वनपर्व उपसंहार. ) परंतु या ठिकाणीं ' विश्वंभर ' किंवा ' लीलाविश्वंभर ' हा आपला गुरु होता, असें मुक्तेश्वर साफ म्हणतात; पण ' विश्वंभर ' हा त्यांचा बाप व ' लीला ' ही त्यांची आई, असा शब्दभेदात्मक नात्यागोत्याचा संबंध कोणत्या आधारावर लावावयाचा, हेंच आम्हांला कळत नाहीं. रा. पांगारकरांनीं येथें ' विश्वंभर ' किंवा ' लीलाविश्वंभर ' या मुद्रेनें अंकित झालेलीं दोनच पद्यें दिलीं आहेत, परंतु मुक्तेश्वरांच्या काव्यांतून अशीं आणखीं ३०–३५ पद्यें सुद्धां देतां येतील; पण त्यांवरून ' लीलाविश्वंभर ' हीं मुक्तेश्वरांचीं मातापितरें हें मुळींच सिद्ध करतां येणार नाहीं. मुक्तेश्वरांनीं आपल्या आईचें नांव कोठेंही दाखल केलें नाहीं, व जेव्हां जेव्हां वडिलांचें नांव देण्याचा प्रसंग आला, तेव्हां तेव्हां त्यांनीं ' चिंतामणि ' हें नांव दिलें आहे, ' चिंतामणि ' व ' विश्वंभर ' यांचें ऐक्यही त्यांनीं कोठेंच दर्शित केलेलें नाहीं; उलट, वरील ' तो मुद्गल चिंतामणिसुत ' इत्यादि ओवींत त्यांनीं या दोघांतील भिन्नत्वच स्पष्टपणें व्यक्त केलें आहे. शिवाय, ' लीलाविश्वंभर ' हा माझा गुरु, असें मुक्तेश्वर म्हणत असतां, ' लीला ' व ' विश्वंभर ' अशीं दोन पदें कल्पून ' लीला ' ही मुक्तेश्वरांची आई किंवा गुरुपत्नी कल्पिण्याचें कोणीही भारदस्त प्रयोजन किंवा प्रमाण पुढें आणिलेलें नाहीं. ' लीलाविग्रही,' लीलावतारी,' इत्यादि परमेश्वरास

लाविलेल्या नांवांतील ' लीला, ' व मुक्तेश्वरांनीं ईशस्वरूप मानिलेल्या आपल्या गुरूस लाविलेल्या ' लीलाविश्वंभर ' या नांवांतील ' लीला,' या दोहोंत आम्हांला तरी कांहींएक वास्तविक भेद करितां येईल, असें वाटत नाहीं. रा. राजवाडे म्हणतात, कीं, ' मुक्तेश्वर आपल्या काव्यांत हिला ( आईला ) लीला म्हणून संबोधतो' ! पण ही केवळ रा. राजवाड्यांची कल्पना आहे. तिला योग्य आधाराचा पाठिंबा मिळेपर्यंत ती खरी मानणें, म्हणजे तिची योग्य किंमत करणें नव्हे. तसेंच इ. स. १५९९ त समाधिस्थ होणाऱ्या एकानाथांनीं आपल्या मुलीचें आवडतें नांव ' लीला ' ठेविलें होतें, व इ. स. १६०९ त म्हणजे १०-११ वर्षांनंतर जन्मास आलेल्या मुक्तेश्वरांनीं आपल्या बोबडेपणीं तें उचललें, हींही विधानें निश्चयात्मक पुराव्यांशीं जोंपर्यंत संघटित झालीं नाहींत, तोंपर्यंत तर्क किंवा कल्पनाखेळ ह्यांच्यापेक्षां वरील पायरीस तीं चढूं शकणार नाहींत. जयराममसुताची संतमालिका ग्रंथमालेंत रा. राजवाड्यांनीं व महाराष्ट्रकवींत रा. भाव्यांनीं छापिली आहे. पैकीं ग्रंथमालेंत ' लीलाविश्वंभरचिंतामणि मुक्तेश्वर, ' अशीं पदें आलीं आहेत, व महाराष्ट्रकवींत त्याच ठिकाणीं 'लीलाविश्वंभर, चिंतामणि, मुद्गल कृष्णदास, ' असा पाठ आहे. रा. राजवाड्यांनीं ' लीलाविश्वंभरचिंतामणि मुक्तेश्वर, ' अशीं दोन पदें लिहून व मुक्तेश्वरापुढें स्वल्पविराम देऊन, हें सर्व एका संताचें-किंबहुना मुक्तेश्वराचें-नांव आहे, असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. रा. भाव्यांनीं ' *लीलाविश्वंभर, चिंतामणि, मुद्गल कृष्णदास, ' अशीं पदें पाडून, तीन संत ठरविले आहे. † उवद्धचिद्धनाच्या संतमालिकेंत ' जोगा विश्वंभर लीलया ' असें एका संताचें नांव आढळतें. परंतु यावरून लीलाविश्वंभर, चिंतामणि व मुक्तेश्वर यांचे परस्परसंबंध ठरविणें अशक्य आहे. काव्यसंग्रहांत मुक्तेश्वरी प्रकरणांच्या शेवटीं एक विश्वंभराची आरती छापिली आहे. तींत शेवटचा चरण असा आहेः- ' संतोषें सुत रक्षी. गुरु विश्वंभर नाथा ! ' येथें कवीनें आपल्याला ' सुत ' व विश्वंभराला ' गुरु ' म्हटलें आहे, या पराला पकडून, ' विश्वंभरबुवा हे मुक्तेश्वराचे वडील व गुरु होते, ' असें भलें उंच उड्डाण करण्याचा कोणी प्रयत्न करितील, हें आम्ही समजून आहों. परंतु यासंबंधानें पुढील गोष्टी ध्यानीं आणिल्या पाहिजेतः-( अ ) 'गुरु' याचा अर्थ ' वडील ' ' बाप ' असा असला तरी तो सरळ व्यावहारिक अर्थ नव्हे. ( आ ) शिष्य आपल्याला गुरूचे ' सुत ' म्हणून घेतात. हा प्रकार मराठी

* महाराष्ट्र कवींतील महाराष्ट्र काव्य ग्रंथ ९, स्फुटसंग्रह भाग १ ला, पृष्ठ ८.

† किता. पृ० ५.

कवींत बहुमत आहे. ज्ञानेश्वर आपल्याला ' निवृत्तिसुत ' म्हणवितात. महिपति, एकनाथांना ' जनार्दनाचा सुत ' व ' जनार्दनाचें तान्हें बाळ ' अशा शब्दांनीं भक्तविजयांत उल्लेखितात. ' एका जनार्दन, ' ' उद्धवचिद्धन, ' ' साम्राज्य वामन, ' ' शिवदिन केसरी, ' ' बापू वामन, ' वगैरे नांवांत शिष्यांनीं आपल्या नांवापुढें गुरूचें नांव-बापाच्या नांवाप्रमाणेंच हुबेहूब-जोडलेलें आढळतें. ( इ ) तिसरी, परंतु मुख्य मुद्द्याची गोष्ट ही, कीं, या आरतींत कवीचें नांवच नसल्यामुळें, ही आरती मुक्तेश्वराचीच कीं काय, हा प्रश्न उद्भवतो, व त्याचें उत्तर छातीला हात लावून ठामपणें कोणालाही देतां येणार नाहीं, असें भासतें. अर्थात्, ही संदेहस्थिति ' मुक्तेश्वर हा विश्वंभराचा मुलगा ' या कल्पनेच्या मूळावरच कुऱ्हाडीप्रमाणें आदळते व वाद तेथेंच मिटतो ! ' × पैठणास एकनाथांनीं चिंतोपंत ऊर्फ विश्वंभरबोवा यांस घरजांवई करून आपल्याजवळ ठेविलें होतें .....तेथें नाथांच्या शिक्षणांत मुक्तेश्वराचें बाळपण गेलें......असें नुकतेंच मला श्रीनाथपैठणसंस्थानच्या कारभाऱ्यांकडून समजलें, " असें रा. पांगारकर लिहितात. परंतु अशा तऱ्हेच्या तोंडातोंडी किंवा दंतकथांवरून मिळालेल्या माहितीचा फार जपूनच उपयोग केला पाहिजे, व तिच्यावर एकदम विश्वास ठेवितां कामा नये. ' तो मुद्गल चिंतामणिसुत ' या ओवींत मुक्तेश्वर स्वतःच जर ' चिंतामणि ' व ' लीलाविश्वंभर ' या निरनिराळ्या व्यक्ति होत्या असें सांगतात, तर मग वरील माहिती खरी कशी मानावी ? कवीनें स्वतःविषयीं दिलेली माहिती व त्याच्या ग्रंथांतील दुसरीं अंतःप्रमाणें, यांशीं दंतकथांचा किंवा लोकवार्तांचा विरोध येईल, तर त्या दंतकथा व लोकवार्ताच टाकाऊ ठरविणें जरूर आहे. याचें एक ढळढळीत उदाहरण नुकतेंच आमच्या पाहण्यांत आलें आहे. कोणत्याही कुळांतील कुलदैवतें, म्हणजे कुलस्वामी व स्वामिनी, हीं कधींही बदलत नसतात. कुलाचा कितीही विस्तार होवो, हीं दैवतें नेहमीं अचल राहतात; व एकाच खुंटाच्या निरनिराळ्या शाखा कितीही दूर गेल्या, तरी आडनांव, गोत्र, व कुलदैवतें, यांचा मेळ बसल्यास त्यांचें एकमूळ निश्चित होतें. परंतु कित्येक कुलांचीं कुलदैवतें निरनिराळ्या पिढींत बदलेलीं आढळतात, हा चमत्कार नव्हे काय ? कित्येकांस आपल्या कुलदैवतांचीं नांवेंच माहीत नसतात, मग प्रसंगीं त्यांनीं नवीन कुलदैवतें स्वीकारिलीं, तर त्यांत नवल काय ? रंगनाथ निगडीकर यांचे वंशज आपलें कुलदैवत ' दत्त ' म्हणतात, रंगनाथ निगडीकरांचे पुतणे

× महाभारताचे मराठी अवतार, पृ० ९.

पांडवप्रतापाचे कर्ते श्रीधरस्वामी यांचे वंशज आपलें कुलदैवत 'विठ्ठल' सांगतात. आतां या दोन्ही कवींचें कुल एकच, तेव्हां कुलदैवतही एकच पाहिजे, मग हा असा फरक कां? परंतु विशेष चमत्कार तो पुढेंच आहे. रंगनाथ व श्रीधर हे दोन्ही आपल्या ग्रंथांत आपलें कुलदैवत 'मल्लारी मार्तंड' म्हणून स्पष्ट लिहितात! तेव्हां आतां रंगनाथांचे व श्रीधरांचे वंशज ह्या दोघांची कुलदैवतांसंबंधी माहिती उघड अविश्वसनीय ठरते. तसेंच वामनपंडित आपला गुरु 'सच्चिदानंदयतिरूपधारी परमेश्वर' म्हणून ५।६ ठिकाणीं लिहितात, पण दंतकथा त्यांच्या गुरूचें पद समर्थ रामदासांस देते. अर्थात्, ती दंतकथा टाकाऊ होय. तेव्हां, प्रस्तुत वादविषयांतही मुक्तेश्वरांचें स्वतःचें विधान व दंतकथा, आणि तोंडोतोंडी माहिती, यांत विरोध असल्यामुळें, त्या दंतकथांना व माहितीला हीनत्व येतें, हें सिद्ध आहे.

## ९ जुन्या मराठी काव्य वाङ्मयाचें स्वरूप.

तेराव्या शतकांतील ज्ञानेश्वरापासून तों तहत् अठराव्या शतकांतील महिपति-मोरोपंतांपर्यंत शेंकडों मराठी कवींनीं जे असंख्य लहानमोठे मराठी पद्यग्रंथ लिहून आपल्या भाषेची व समाजाची स्वयंप्रेरित सेवा केली, त्यांपैकीं आजमितीला उपलब्ध व प्रकाशित असलेले ग्रंथ, एकंदर सांठ्याचा फारच अल्प अंश असून, नष्टप्राय, अनुपलब्ध, किंवा अप्रकाशित, असलेला अंशच फार दांडगा असावा, असें अनुमान करण्यास पुष्कळ जागा आहे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें हें सर्व जुनें वाङ्मय नजरेस पडेपर्यंत एकंदर पुरातन मराठी वाङ्मयासंबंधें कोणतेंही सरसहा विधान करणें, किंवा परीक्षक दृष्टीनें त्याच्या स्वरूपाविषयीं एकादा व्यापक सिद्धान्त काढणें, शक्य किंवा निर्धोस्त नाहीं, हें आम्हांला अगदीं कबूल आहे. पण ज्या प्रदेशावर थोडाबहुत प्रकाश पडलेला आहे, व जो आटोक्यांतील असून अवलोकनशक्तीला अभेद्य राहिलेला नाहीं, त्या प्रदेशावर सहल करून, त्याचा विस्तार व ठेवण, सौंदर्य व भव्यता, संपन्नता व सुपीकता, इत्यादि गुणांसंबंधानें चिकित्सक बुद्धीनें आपलें मत बनविण्याच्या आड तमोवगुंठित प्रदेश येऊं शकत नाहीं. मात्र प्रकाशाची मर्यादा ओलांडून अनुमानचक्रयानें उडी घातली असतां, ती अंधकूपांत पडून चिकित्सक बुद्धीचे सांधे खिळखिळे होण्याचा, किंबहुना, तिच्या ठिकऱ्याही उडण्याचा फार संभव आहे.

तेव्हां उच्छृंखल कल्पकतेचे वागोरे आंवरून, सांप्रत उपलब्ध व प्रकाशित

असलेल्या जुन्या मराठी वाङ्मयाकडे ठोकळ नजरेनें अवलोकन केलें असतां, त्याचे तीन वर्ग करितां येतातः—( अ ) वेदान्तविषयक, ( आ ) भक्तिनीतिपर, व ( इ ) *मनोरजनात्मक. अर्थात्, ही फाळणी ग्रंथांची आहे, कवींची नाहीं; कारण, एकाच कवींचे कांहीं ग्रंथ पहिल्यांत, तर कांहीं दुसऱ्या किंवा तिसऱ्या वर्गांतही येतील.

पहिल्या वर्गांतील ग्रंथ गहन तत्त्वज्ञानावर आहेत, व अद्वैतसिद्धान्त–जीवशिवैक्य–परमात्म्याचा विश्वयोग–विराट्स्वरूप–हें या वर्गाचें जीवन होय. ज्ञानेश्वरी, यथार्थदीपिका, अमृतानुभव, योगवासिष्ठ, गीतार्णव, पंचीकरण, † दासबोध, इत्यादि ग्रंथ या वर्गांतील होत. हे ग्रंथ समजून वाचणाऱ्यांपेक्षां, ' एकैकमक्षरं पुंसां महापातकनाशनम् ' या फलश्रुतीवर कटाक्ष ठेऊन भक्तिभावानें नित्यपाठासाठीं जवळ बाळगणारांचीच संख्या अधिक आहे, यांत शंका नाहीं.

दुसऱ्या वर्गांतील ग्रंथांची समाजदृष्ट्या किंमत फार आहे. या वर्गांतील वाङ्मय बहुतेक अभंग व पदें या रूपानें आहे, व त्याचा सामान्यजनसमूहावर अत्यंत संस्कार झालेला आहे. दरोबस्त उच्चनीच वर्णांना या वाङ्मयाचा दृढ परिचय आहे. यांतील अनेक वचनें महाराष्ट्रीयांच्या तोंडीं म्हणीवजा कशीं बसलीं आहेत जातिभेदाचे शल्यास न जुमानतां हरएक भजनादि प्रसंगींचा यानें कसा मक्ता घेतला आहे, कितीही कर्मठ ब्राह्मण हरिदासाचें कीर्तन असो, तें बहुशः ' हेंचि दान दे गा देवा, ' या शूद्रकवीच्या अभंगवाणीशिवाय कसें संपूर्ण होऊं शकत नाहीं, प्रत्येक मंत्रपुष्पाची अखेरी ' घालीन लोटांगण वंदीन चरण, डोळ्यांनीं पाहीन, रूप तुझें, ' या नामदेवाच्या उक्तीनें कशी निरपवादपणें पटकावली जाते, या गोष्टी लक्ष्यांत घेतल्या, म्हणजे या वाङ्मयाचीं पाळेंमुळें मराठ्यांच्या मानसभूमींत किती खोल जाऊन जीवंत झऱ्याला पोंचलीं आहेत, तें लक्ष्यांत येईल. या वाङ्मयाची

* महिपतीचे भक्तविजयादि ग्रंथ, अठराव्या शतकांतील शाहिरांचे पोवाडे, वगैरे जी अर्धवट ऐतिहासिक स्वरूपाची कृति आहे, तिचा आम्ही विशेषतः ह्याच वर्गांत अंतर्भाव करितों.

† हा ग्रंथ कोणत्या वर्गांत घालावा, हें एक मोठें कोडेंच आहे ! त्यांत वेदांत पाहिजे तर वेदांत आहे, व्यवहार पाहिजे तर व्यवहार आहे, राजकारण पाहिजे तर तेंही आहे. एकंदरींत हा ग्रंथ अष्टपैलू आहे. येथें हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे, कीं, कोणताही वेदान्तग्रंथ व्यवहारापासून अगदीं अलिप्त असणें शक्यच नाहीं, ही गोष्ट खरी आहे; परंतु दासबोधांत तात्विक गोष्टींइतकेंच, किंबहुना जास्तीही, महत्व व्यावहारिक गोष्टींना दिलेलें आहे.

वाणी साधी पण तेजस्वी, असंस्कृत पण अर्थपूर्ण, वेंचक पण अकृत्रिम, अशी आढळते. भक्तिविषयक अभंग व पदें अत्यंत प्रेमळ, कोमळ, रसाळ, व तल्लीनता उत्पन्न करणारीं, आहेत. समाजांतील रोगट भागावर शस्त्रप्रयोग करून रक्तशुद्धि करीत असतांना, दांभिकांचा रहस्यस्फोट करितांना, नास्तिक अभक्तांवर गहजब उडवितांना, व हानिकर रूढींच्या शृंखळा खळाखळ तोडतांना, या अभंगपदात्मक वाङ्मयाची वाणी प्रसंगानुसार बेमुर्वतीची, भेदक, जहाल, व खड्गाप्रमाणें खणखणणारी, आढळते.

तिसऱ्या वर्गांतील वाङ्मय बरेंच विस्तृत आहे. याचा प्रधानहेतु जरी मनोरंजन हा दिसतो, तरी तो साधून, तदनुषंगानें वेदान्त, भगवद्भक्ति, नीति, सदाचार, सात्विकतेचें महत्व, राजसतामस कृत्यांचे दुष्परिणाम, इत्यादि मुद्द्यांसंबंधें मार्मिक विचार प्रगट करून, या ग्रंथांत लोकशिक्षणाचा मार्ग चोखाळलेला आहे. काव्यविषयास साजतील, हरिदासादिकांस कथाकीर्तनप्रसंगीं उपयोगीं पडतील, स्त्रिया व सामान्य लोक यांस मनोरंजक होतील, अशीं आख्यानें निवडून, त्यांत गंभीर विषयांचें तत्त्व प्रसंगानुसार घोळून, समाजाला रोचक व पाचक होतील, अशा रीतीनें दिलेल्या ज्ञानगुटिका या वाङ्मयांत आढळतात. यांतील कांहीं अत्यल्प अपवाद वगळले असतां, सर्व कथानकें रामायण, भारत, भागवत, इत्यादि पुराणग्रंथांतून घेतलेलीं आहेत; तरी पण कालिदास, जयदेव, भर्तृहरि, इत्यादि कवींच्या काव्यांचें साहाय्य घेऊन आमच्या मराठी कवींनीं मधून मधून आपल्या काव्यांचा स्वाद वाढविलेला आढळतो. पुराणग्रंथ धार्मिक मानिले गेल्यामुळें या वर्गांतील वाङमयाला धार्मिकपणाचीही जोड मिळाली आहे. ज्या मनांवर स्वतंत्र ज्ञानाचा फारसा संस्कार झालेला नसतो, त्यांवरच विलक्षण अतिशयोक्ति, अद्भुत चमत्कार, अमानुष पराक्रम, राक्षसी माया, इत्यादि प्रकारांची छाप पडून, ती पूज्यभाव, कौतुक, व आनंद, हीं उत्पन्न करण्यास कारणीभूत होते. या वर्गांतील वाङ्मयाच्या लोकप्रियतेंत हेंही बीज आहेच. असो; या तृतीय वर्गांत ज्या कवींची कृति उज्ज्वलपणानें आज चमकत आहे, त्यांपैकीं अध्वर्यूत मुक्तेश्वरांची गणना होते.

## १० मुक्तेश्वरांचें शिक्षण.

मुक्तेश्वरांचे ग्रंथ साधारणतः कोणत्या प्रकारचे आहेत, याचें स्थूल प्रकारानें दिग्दर्शन मागील परिच्छेदांत झालें. आतां त्यांच्या काव्यासंबंधें विस्तृत ऊहापोह करण्यापूर्वी, त्यांच्या शिक्षणाविषयीं चार शब्द लिहिले असतां, ते केवळ

अस्थानीं होतील, असें वाटत नाहीं. हिंदुस्थानांत संस्कृत शिक्षणाची जुनी शास्त्री पद्धति कित्येक शतकेंपर्यंत सारखी अबाधित चालू होती व ती अजूनही कित्येक ठिकाणीं आढळते. विद्याखात्यानें संस्कृतशिक्षण हातीं घेतल्यापासून तें शिकविण्याची नवी पाश्चात्य पद्धति इसवी सनाच्या एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला अमलांत आली; तरी पण जुन्या शास्त्रीमंडळांत अद्यापि जुनी पद्धतीच थोड्याबहुत फरकानें अस्तित्वांत आहे. अमरकोश, रूपावळी, समासचक्र, हीं झाल्यावर, सबंध अथवा अर्धवट कौमुदीचें पठण, नंतर संस्कृत महाकाव्यांपैकीं कांहीं काव्यें, थोडींशीं नाटकें, कादंबरी, हितोपदेश, पंचतंत्र, इत्यादिकांचें वाचन व पठण, याप्रमाणें अध्ययनाच्या पूर्वभागाचा या पद्धतींतील क्रम दिसतो. यानंतर शिकणाराच्या अभिरुचीप्रमाणें पुराणग्रंथ, किंवा तर्क, न्याय, मीमांसा, यांपैकीं एक किंवा अधिक दर्शनें, किंवा ज्योतिष, गणित, वगैरेंपैकीं एकाद्या विशिष्ट शाखेंतील ग्रंथाचें अध्ययन झालें, म्हणजे बहुधा शिक्षण आटोपलें, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. मुक्तेश्वरांचें शिक्षण या पंथानें झालें होतें, असें त्यांच्या ग्रंथावरून दिसतें. मुक्तेश्वरांचा पुराणग्रंथांशीं परिचय होता, ही गोष्ट तर स्वयंसिद्धच आहे; परंतु त्यांचे झोंकदार संस्कृत शब्द, डौलाची वर्णनपद्धति, मनोहर कल्पना, व शब्दार्थालंकारांची हौस, ह्यांकडे लक्ष्य दिलें म्हणजे पुराणेतर संस्कृत वाङ्मयोद्यानांत यथेच्छ विहार करून त्यांतील सुगंधि पुष्पें, कोमल किसलय, व स्वादिष्ट रसाळ फळें, यांचा संग्रह त्यांनीं आपल्या कवितावधूसाठीं केला होता, असें म्हणणें भाग पडतें. या मुद्द्याची आणखी फोड पुढील परिच्छेदांत येणार आहे. मुक्तेश्वरांची न्यायतर्कमीमांसादि दर्शनांशीं बरीच घसण होती, व त्या विषयांचें त्यांस सादर प्रेम होतें, हें, त्यांनीं व्यासजैमिनिवसिष्ठगौतमकपिलपतंजलि यांना आदिपर्वांत जें मोठ्या गौरवानें नमन केलें *आहे, त्यावरून, व कण्वाश्रमाचें वर्णन करितानां चार्वाकमीमांसादि मतवाद्यांचीं प्रमेयें व वादविवाद यांचा जो †पंधराव्या अध्यायांत विस्तारशः उल्लेख केला आहे, व ज्याला व्यासभारतांत आधार नाहीं, त्यावरून सिद्ध होतें. मुक्तेश्वरांनीं प्राकृत कवींचेही ग्रंथ मनःपूर्वक वाचले होते, असेंही बिनधोक अनुमान काढितां येतें; कारण, त्यांनीं आपल्या भारती पर्वांत आपल्यापूर्वीं ज्या कवींनीं प्राकृतांत भारतावर टीका केल्या होत्या, त्यांचा मोघम उल्लेख करून, व्यासकृतींत आढळत नाहींत

* आदि. ११७३–७४

† आदि. १५१८२–९३.

अशा कथाचें भारूड उगाच माजविल्याबद्दल त्यांस शाब्दिक टोलेही दिले आहेत. हे टोले यथार्थ आहेत कीं काय, याचा पुढें विचार करण्यांत येणार आहे. प्राकृत कवींपैकीं ‡ज्ञानेश्वर व एकनाथ यांनांच कायतें मुक्तेश्वरांनीं सादर नमन केलेलें आढळतें. नामदेव, मुकुंदराज, दासोपंत, इत्यादिकांचा त्यांनीं कोठें मागमूसही लागूं दिलेला नाहीं. ज्ञानेश्वरास ते 'प्राकृत कवीश्वराचार्य' व 'ज्ञानिवर्य' या विशेषणांनीं गौरवून त्यांच्या बुद्धीचें गांभीर्य समुद्राप्रमाणें अगाध होतें, असें सांगतात. एकनाथांप्रमाणें ज्ञानेश्वरांवरही मुक्तेश्वरांची आरती उपलब्ध आहे, तींत कवीची प्रेमळ वृत्ति उत्कटत्वानें दिसून येतेः—

**सकल सिद्धगणांमाजी तूं श्रेष्ठ। ज्ञानदेवीं अनुभव ज्ञानावरिष्ठ॥**
**अनुतापदीप विश्वीं घनदाट। मुक्तेश्वरीं न धरवे प्रेमाचा लोट॥**

मुक्तेश्वरांनीं आपल्या वाङ्मयात्मक शिक्षणाला अनुभवज्ञान व व्यवहारनिरीक्षण यांचीही उत्तम जोड लाभूं दिली आहे. त्यांनीं स्वतः भरतखंडाच्या सर्व भागांत प्रवास करून अनेक तीर्थें, क्षेत्रें, व पुरें, पट्टणें, पाहिलीं होतीं. प्रांतोप्रांतींच्या आचारपद्धति, भाषारीति, विचारसमजुती, समाजांतील व्यंगें, राजकारण, सृष्टिरचना, इत्यादि यथास्थित अवलोकन करून, त्यांनीं रुचीप्रमाणें, विषयाचें तानमान पाहून, आपल्या बहुश्रुतपणाचा उपयोग काव्यरचनेच्या वेळीं केला आहे. व्यासकृतींत न आढळणारा विस्तार व पाल्हाळ जो कित्येक ठिकाणीं मुक्तेश्वरी कृतींत दृष्टोत्पत्तीस येतो, त्यांतील बीज ह्या बहुश्रुतपणाची चुणूक दाखवून, त्याची वानगी वाचकांस द्यावी, हेंच होय.

## ११ एक जुना वाद.

निबंधमालाकारांनीं जेव्हां 'मोरोपंताची कविता' हा निबंध प्रसिद्ध केला, तेव्हां एक चमत्कारिक वाद उत्पन्न झाला. मालाकारांनीं आपल्या मालेच्या ४७ व्या अंकांत पुढील विधान केलें होतेंः—'अगदीं अव्वलपासून तों अखेरपर्यंत कोणत्याही मराठी कवीस 'रघुकिरातादि' पंडितमान्य काव्यांची बिलकूल ओळख होतीशीसुद्धां दिसत नाहीं. नामदेव, तुकाराम, यांची गोष्ट तर बोलायलाच नको. पण पंडितमंडळींत बरेच मोडण्यासारखे जे वामन, मोरोपंत, रामजोशी, वगैरे, ह्यांच्या ग्रंथांतही कालिदासादिकांचा मागमूसही नजरेस

‡ एका मुक्तेश्वरी पदांत ज्ञानेश्वरांचीं भांवडें, उद्धव, व गोरख, यांचा उल्लेख आहे.

येत नाहीं. संस्कृत कवींच्या धर्तीवर जुनें मराठी काव्य म्हटलें म्हणजे रघुनाथ पंडिताचें ' नलोपाख्यान ' च होय; त्याची रचना श्रीहर्षाच्या ' नैषधा ' च्या नमुन्यावर केली आहे, असें कवीनेंच सरतेशेवटीं सांगितलें आहे. पण याखेरीज बाकीच्या कोणत्याही महाराष्ट्रकाव्यांत जुन्या संस्कृतकवींची पद्धति कोणत्याही संबंधें बिलकूल दृष्टीस पडत नाहीं. " या विधानावर आक्षेप घेऊन. रा. वामनराव ओकांनीं एक खरमरीत पत्र लिहिलें. त्यांत त्यांनीं ' कांहीं श्रीहनुमंतनाटककथा, कांहीं रघुवंशिंची " ह्या विठ्ठलकृत केवळ एका पंक्तीचें अवतरण देऊन, मराठी कवींस रघुकिरातादि काव्यें ठाउकीं होतीं असें सिद्ध केलें, व मराठी कवींची लाज राखिली ! विठ्ठलाप्रमाणेंच ‡मुक्तेश्वर व †मोरोपंत यांनींही ' हनुमंत ' नाटकाचा आपल्या ग्रंथांत एकेकदा उल्लेख केलेला दिसतो. मुक्तेश्वरी रामायणाच्या आरंभीं त्यांच्या भक्तानें जो प्रशस्तिपर श्लोक लिहिला आहे, त्यांतही ' नानानाटकभावपद्यरचनासंदोहसांद्रीकृता ' असा मुक्तेश्वरांच्या वाणीचा गौरव करून, त्यांस संस्कृत नाटकादिकांचा परिचय होता असें सुचविलें आहे. परंतु मराठी कवींनीं व्यासवाल्मीकादि पुराण ऋषिकवींच्या मागून झालेले जे कालिदासबाणभवभूत्यादि संस्कृतकवि, त्यांचा किंवा त्यांच्या ग्रंथांचा आपल्या काव्यांतून उल्लेख केलेला कायतो आज मितीपर्यंत वर दोनचार स्थळींच आढळला आहे. ह्यापलीकडे आमच्या महाराष्ट्रकवींनीं त्यांचा प्रत्यक्ष उल्लेखानें कोठेंही मागमूस लागूं दिला नाहीं, ही गोष्ट अगदीं खरी आहे. परंतु अशा तऱ्हेच्या प्रत्यक्ष उल्लेखावरूनच या मराठी कवींस कालिदासादि कवींची माहिती होती किंवा नाहीं, व असल्यास किती होती, याचा निकाल लावूं पाहणें, म्हणजे प्रश्न उलगडण्याचा योग्य मार्ग सोडून देण्यासारखें आहे. रा. वामनराव ओकांच्या पत्रास उत्तर देतांना निबंधमालाकारांच्या लक्ष्यांत हा मुद्दा आला व ते आक्षेपकारांवर असे घसरले*—" आमच्या प्रतिपक्षानें ' कांहीं श्रीह-

‡ ' हे हनुमंतनाटकींची कथा । महाराष्ट्रभाषा यथार्थ उलथा ।
विश्वंभर झाला वक्ता । मुक्तेश्वर अनुवादे ॥ १३३ ॥

—मुक्तेश्वरकृत शतमुखरावणवध.

† ' यावें, दर्शन द्यावें, बोलावें, डोलवून डोलावें, ।
वाटे स्वमंत्ररामायण निज नाटक तुम्हींच तोलावें ॥ ६६ ॥

—मोरोपंतकृत नामरसायन.

* निबंधमाला अंक ६२.

नुमंतनाटककथा, कांहीं रघूवंशिंची, ' येवढ्या एका पराला धरून जें येवढें उड्डाण केलें आहे, त्यापेक्षां दहावीस वामनी श्लोक किंवा पांचपंचवीस मोरोपंती आर्या, अथवा विठ्ठल कवीचीं दहापांच ' चित्रकूटें ' घेऊन, त्यांशीं समानार्थक अशीं जर पंचमहाकाव्यांतील कांहीं स्थलें दाखविलीं असतीं, तर आम्हीं आपला लेख संतोषानें माघारी घेतला असता;..." परंतु यावर रा. ओकांनीं उत्तर दिलेलें आमच्या पाहण्यांत नाहीं. तेव्हां या दोन मल्लांपैकीं कोणाची पाठ पेंचांत सांपडून भुईस लागली, तें सांगतां येत नाहीं. परंतु वामनाच्या नांवावर मोडणारी भर्तृहरीच्या शतकांची व जगन्नाथरायाच्या गंगालहरीची मराठी प्रतिमा, पंतांनीं आपल्या † कुशलवाख्यानाच्या पहिल्या चार अध्यायांत रघुवंशाचा केलेला उपयोग, व ' प्रश्नोत्तरमाला ' नांवानें शंकराचार्यांच्या एका काव्याचा केलेला मराठी उलथा, भानुदासकृत संस्कृत रसमंजरीचें विठ्ठलानें केलेलें मराठी रूपान्तर, आणि बिल्हणचरित्र, वगैरे ठोकळ उदाहरणें देऊन निबंधमालाकारांचें तोंड थोडेंबहुत बंद करितां आलें असतें. *हल्लीं खुद्द मोरोपंतांचें दप्तर रा. पांगारकर यांचे हातीं आहे, व त्यांत पंतांनीं जातीनें उतरलेलीं पांच पंचवीस संस्कृत काव्यें व नाटकें आहेत, अशी माहिती त्यांनीं प्रसिद्ध केलेली आहे. तेव्हां मोरोपंतांसंबंधें हा वाद आयताच अनायासानें तुटला. प्रस्तुत स्थळीं आम्ही मुक्तेश्वरांसंबंधेंमात्र ऊहापोह करणार आहों.

वामन, मुक्तेश्वर, मोरोपंत, दासोपंत, विठ्ठल, आनंदतनय, वगैरे कवि ‡पांढरपेशे विशेषतः ब्राह्मणवर्णाचे—असून लहानपणापासून विद्याव्यसनी पंडितांच्या सहवासांत वाढलेले होते. तेव्हां त्यांचें संस्कृताचें शिक्षण शास्त्री पद्धतीनें झालें असलें पाहिजे, असें मानल्याशिवाय सुटका नाहीं, व या पद्धतीचा आपल्याला जो प्रत्यक्ष अनुभव आहे, त्यावरून इतकें खास आहे, कीं, या पद्धतींत कालिदास, माघ, भवभूती, इत्यादि संस्कृत कवींचा थोडाबहुत परिचय झाल्यावांचून राहत नाहीं. म्हणून, वरील कवींस या संस्कृत कवींची माहिती होती कीं नाहीं, हा प्रश्नच वास्तविक निघण्याचें कारण नाहीं.

---

† काव्यसंग्रहग्रंथमाला, ग्रंथ ५३, मोरोपंती स्फुटकाव्यें भाग. ३, परिशिष्ट पहा.

* इ. स. १९०४

‡ आमचें हें विधान शूद्र कवींना लागून नाहीं, हें उघड आहे. जें अनुमान ब्राह्मण कवींविषयीं—विशेषतः पंडितांच्या संसर्गांत वाढलेल्या कवींविषयीं—आपण करूं शकतों, तेंच शूद्र कवींविषयीं करूं म्हटल्यास अस्तिपक्षी भरभक्कम पुराव्याची जरूरी आहे.

## १२ संस्कृत काव्यपरिचय.

मुक्तेश्वरांनीं आपलीं काव्यें-विशेषतः रामायण-रचतांना जयदेवकालिदासादिकांचें साहाय्य घेतलें होतें, हें स्पष्ट करून दाखवितां येण्यासारखें आहे. शास्त्री पद्धतीनें शिकलेल्या कवींनीं व्याकरणशिक्षणानंतर काव्यनाटकांचेंच परिशीलन केल्यामुळें, त्यांच्या पहिल्या कृतींत संस्कृत वाङ्मयांतील या भागाचें अनुकरण आढळणें ताज्या व जागत्या संस्काराला अनुसरूनच आहे. परंतु, पुढें जसजसा पुराणव्यासंग होऊन, तो दृढ होत चालला, तसतसा वरील काव्यनाटकांचा नाद मागेंमागें पडत जावा, हेंही अगदीं स्वाभाविक आहे. मोरोपंत व मुक्तेश्वर या दोन कवींसंबंधें हा सिद्धांत स्पष्ट नजरेस येतो. मोरोपंतांचें पहिलें मोठें काव्य जें कुशलवाख्यान, त्यांत रघुवंशाचें अनुकरण ठिकठिकाणीं आढळतें; त्याप्रमाणेंच मुक्तेश्वराचें पहिलें काव्य कौतूहलरामायण-मुक्तेश्वरांनीं दिलेलें नांव घेतल्यास संक्षेपरामायण-यांतही जयदेवकृत प्रसन्नराघव हनुमन्नाटक, वगैरे कृतींचें बरेंच अनुकरण दृष्टोत्पत्तीस येतें; इतकें ढोबळ व तंतोतंत अनुकरण त्यांच्या पुढील कृतींत भासून येत नाहीं. यासंबंधें कांहीं उदाहरणें दाखल करितों.—

**( अ ) §संस्कृत—उत्क्षिप्तं सह कौशिकस्य पुलकैः, सार्धं मुखैर्नामितं**
**भूपानां, जनकस्य संशयधिया साकं समास्फालितम् ।**
**वैदेहीमनसा समं च सहसाकृष्टं, ततो भार्गव-**
**प्रौढाहंकृतिदुर्मदेन सहितं तद्भग्नमैशं धनुः ॥**

—हनुमन्नाटक.

**मुक्तेश्वरी—उभित सह मुनीची रोमराजी विनोदें,**
**नमित सह नृपांची शीसरंभारवृंदें, ।**
**सह जनकविकल्पा स्फाळिलें चाप नेटें,**
**सहित मन सितेचें चाप ओढीत बोटें; ॥ ९१ ॥**

---

§ विठ्ठलानें याच श्लोकाचें भाषांतर असें केलें आहे:—
रामानें सहवर्तमान मुनिच्या कोदंड उच्चालिलें,
राजे आणि विदेहसंशयधिया संयुक्त आस्फाळिलें, ।
सीताचित्तसमेत ओढुनि, भृगूपुत्रादि साहंकृती,
त्यांचा दुर्मद गर्व भंगुनि धनुर्भृत् व्यक्तसर्वाकृती ॥ १९ ॥
—सीतास्वयंवर, सर्ग ५.

सहित भृगुपतीच गर्व, लोकीं न जोडा,
त्रुटित विकट ओढीं भंगला वज्रमेढा । पूर्वार्ध, ९६

—बालकांड.

(आ) † संस्कृत—कमठपृष्ठकठोरमिदं धनुर्मदनमूर्तिरसौ रघुनंदनः।
कथमधिज्यमनेन लघीयसा अहह! तात! पणस्तव
दारुणः ॥

मुक्तेश्वरी—शिवधनु जड कैसें कूर्मकाठिण्य पृष्ठीं।
मदनजनक हा हो! लोकलावण्यसृष्टी।
तव कृत पण ताता! सिंधु कैसेनि लंघी?
रघुवर विजयी हो चंडकोदंडभंगीं. ॥ ९१ ॥

—बालकांड.

(इ) संस्कृत—गवद्विजन्मनां तात न शूरा राघवा वयम्।
अयं कंठः, कुठारस्ते; कुरु राम यथोचितम् ॥-

मुक्तेश्वरीः—म्हणे राम तों, 'ब्राह्मणा! ब्रह्मयाती!
नव्हे वीर मी विप्रधनूनिघाती।
करीं शस्त्र तूझे, धरीं कंठ माझा,
करीं आवडे तें महावीरराजा! ॥ ११३ ॥

—बालकांड.

---

† वामनी प्रतिमाः—

बहु कठोर म्हणे धनु जानकी निपट कासवपृष्ठसमान कीं।
रघुपती तरि हा लघु आपण अहह! दारुण तात तुझा पण ॥ २० ॥
मदनशत्रुशरासन हें महा मदनमूर्तिच केवळ राम हा।
करिल सज्ज कसें धनु आपण अहह! दारुण तात तुझा पण ॥ २१ ॥

—सीतास्वयंवर.

विठ्ठलकृतिः—

कठिण कांसवपृष्ठतसें धनू मदनमूर्ति रघूत्तमआननू।
विजयि होइल का न कळे मला अह! पित्या! पण दारुण घातला ॥ ३४ ॥

सीतास्वयंवर. सर्ग ४-

( उ ) संस्कृत—भो ! ब्रह्मन् ! भवता समं न घटते संग्रामवर्तोपि नः
सर्वे हीनबला वयं बलवतां यूयं स्थिता मूर्धनि ।
यस्मादेकगुणं शरासनमिदं सुव्यक्तमुर्वीभुजा-
मस्माकं भवतां पुनर्नवगुणं यज्ञोपवीतं बलम् ॥
—जयदेवकृत प्रसन्नराघव नाटक ४।२५

मुक्तेश्वरी—अतुळबळ बलिष्ठांमाजि तूं श्रेष्ठ रामा !
बळहत जनमेळीं हीन मी दीननामा; ।
नवगुण तव कंठीं ब्रह्मसूत्रप्रभा जे,
मम धनुर्गुणि एकें तूलना केविं साजे ? ॥ ११४ ॥
—बालकांड.

(ऋ) * संस्कृतः–'मातस्तातः क्व यातः ?' 'सुरपतिभवनं,' 'हा कुतः'
' पुत्रशोकात् ' ।
' कोऽसौ पुत्रश्चतुर्णां ?' 'त्वमवरजतया यस्य जातः,'
' किमस्य ? '
' प्राप्तोऽसौ काननान्तं, ' ' किमिति ? ' नृपगिरा, '
' किं तथाऽसौ बभाषे ? ' ।
'मद्वाग्बद्धः' ' फलं ते किमिह ? ' 'तव धराधीशता,'
' हा ! हतोस्मि ' ॥
—जयदेवकृत प्रसन्नराघव नाटक, ५।१८

---

*वरील मूळ जयदेवकृत संस्कृत श्लोकाचें मोरोपंतांनींही बहुतेक अक्षरशः भाषांतर केलें आहेः—

वंदूनि मातेसि तेव्हां म्हणे, ' आज गेला असें सांग कोठें महाराज ! ' ।
' स्वर्गासि गेला कुमारा । तुझा तात; ' ' अंबे ! अकस्मात् झाला कसा घात ! ' ॥१॥
' हा पुत्रशोकेंचि मेला सुता । राय ' ' तो कोणता ! हें मला सांगा हो माय '।
' बंधू नमस्कार सारे करा ज्यास ' ' झालें तया काय ? तो मान्य राजास, '
' स्त्रीबंधु घेऊन गेला अरण्यास, ' ' कां मानिलें हें जनाच्या शरण्यास ? ' ।
' वत्सा ! तुझी तातवाणीच तन्मूळ, ' ' ऐसें कसें बोलिला भूपशार्दूळ ? ' ॥ ३ ॥
' बोले असें भूप मद्वाग्गुणाबद्ध; ' ' कैची फळप्राप्ति ? कां पीडिला वृद्ध ? ' ।
' व्हावें तुला राज्य, तो साधिला काम'. 'हा! पापिणी! काय केलेंसि! हा! राम!' ॥४॥
सारारामायण.

मुक्तेश्वरीः—'सुजन जनक माते ! नेदखे काय केला ?'
'विकळ तनुजशोकें विष्णुलोकास गेला;'।
'कवण कुमर ?' सर्वां 'श्रेष्ठ जो का तुम्हांसी,'
'कवण विगति झाली सांग पां राघवासी ?' ॥८३॥
'दशरथ पति माझे गुंतले भाषपाशीं
दुरितऋण हराया राम गेला वनासीं;' ?
'मर, मर, मर, मूढे ! घात केला जगाचा,
भरतभजनचंद्रा डाग झाला अघाचा' ॥ ८४ ॥

अयोध्याकांड.

( ऌ ) * संस्कृत—पदकमलरजोभिर्मुक्तपाषाणदेहाद्
अलभत यदहल्या गौतमोदारपत्नी ।
त्वयि चरति विशीर्णग्रावविंध्याद्रिपादे
कति कति भवितारस्तापसा दारवन्तः ॥
उपलतनुरहल्या गौतमस्येह शापाद्
इयमपि मुनिकन्या शापिता नाविकस्य ।
चरणनलिनसंगानुग्रहं ते भजन्ती
भवतु चिरमियं नः श्रीमती पोतपात्री ॥

मुक्तेश्वरी—पदसरसिजपंकें मुक्त पाषाणदेहो
तरुवरतनु नौका उद्धरी चोज कीं हो, ।
अवचट अबला हे झालिया देवराया !
त्वरित कवण पोशी कर्कशा दोन जाया ! ॥ ५८ ॥

अयोध्याकांड.

* येथील संस्कृत श्लोकांतील कल्पना मुक्तेश्वरांनीं जरा बदलून योजिलेली आहे, येवढेंच. विठ्ठल कवीनें याच हनुमन्नाटकांतील श्लोकाधारें पुढील श्लोक रचिलेः—

पदकमळरजानें मुक्तपाषाणदेही ऋषिमहिषि आहिल्या पावली साक्ष तेही ।
उपल युवति होती वस्ति विंध्याचलांची रघुपति ! पुरवीली वासना तापसांची ॥ १७ ॥
रघुपति ! करवेना स्त्री दुजी दुर्बळातें, अणुभरि तरि नाहीं भेद काष्टोपळातें ।
धुविन चरणरेणू तीर्थ घेईन जेव्हां वसविन मग नौकेमाजि देवासि तेव्हां ॥ १८ ॥

—सीतास्वयंवर, सर्ग ३.

( ए ) संस्कृत—कांतेनाथ प्रणयमधुरं किंचिदाचञ्चलेन
श्रान्ता श्रान्ता जनकतनया वल्कलस्याञ्चलेन ।
चक्रे वीतश्रमजलकणस्निग्धमुग्धाननश्रीः
श्रान्तः श्रान्तः स पुनरनया लोचनस्याञ्चलेन ॥

—प्रसन्नराघव. ५।२४

मुक्तेश्वरी–वृक्षातळीं वल्लभराज लोभें श्रांतोदकें आननचंद्र शोभे।
सुपल्लवें मारुत मंद वारी चुरी पदें शीतळ तोयधारी।५॥

—अरण्यकांड.

( ऐ ) संस्कृत—पथि पथिकवधूभिः सादरं पृच्छ्यमाना
कुवलयदलनीलः कोयमार्ये तवेति ।
स्मितविकासितगल्लं व्रीडविभ्रांतनेत्रं
मुखमवनमयंती स्पष्टमाचष्ट सीता ॥

मुक्तेश्वरी—पथि पथिकवधू त्या पूसती रामजाये,
' कुवलयदळनीळा कोण हा ? सांग माये ? ।
हसितमन मिनाक्षी रामचन्द्राननातें
निरखित, पतिराजा जाणवे जाण त्यांतें ॥ ६ ॥

—अरण्यकांड.

(ओ) संस्कृत—तद्धस्तं समुपेति लेढि च तृणं संस्पृश्य तद् गाहते
गुल्मान् प्राप्य निवर्तते किसलयानाघ्राय नाघ्राय च ।
भूयस्त्रस्याति पश्याति प्रतिदिशं कंडूयते स्वां तनुं
दूराद् धावाति तिष्ठति प्रचलाति प्रांतेषु मायामृगः ॥

मुक्तेश्वरी—सरक चवक दावी, थोकला पाठि चाटी,
पळत पळत पाहे मागुता दूरि दृष्टी; ।
श्रवणनयन पायें खाजवी, भूमि हुंगे,
विचरत मृगचेष्टा पर्णशाळेसि नीघे ॥ ५१ ॥

—अरण्यकांड.

(औ) * संस्कृत—हारो नारोपितः कंठे मया विरहभीरुणा ।
इदानीमंतरे जाताः सरित्सागरपर्वताः ॥
मुक्तेश्वरी—' रघुपति तुज प्रेमें क्षेम देतां विनोदें
जंव किं निकरिं वैरी हार फेडी विषादें; ।
गिरि, सरि, तरु, आतां मंडलें आड ठेलीं,
म्हणवुनि बहु शोकें जानकी साद घाली ॥ ७४ ॥
—अरण्यकांड.

(क) संस्कृत—रे वृक्षाः पर्वतस्था गिरिगहनलता वायुना वीज्यमाना
रामोहं व्याकुलात्मा दशरथतनयः शोककृच्छ्रेण
दग्धः ।
बिंबोष्ठी चारुनेत्री सुविपुलजघना बद्धनागेन्द्रकांची
हा सीता केन नीता मम हृदयगता केनचित्
क्वापि दृष्टा ॥
मुक्तेश्वरी—रे रे वृक्षा ! गिरींद्रा ! कुरंग ! मृगपते ! चारुचंद्रा! सती ते
बिंबोष्ठी, पद्मनेत्री, जघनघन, कटी मेखलाबंध
जीतें; ।
ते माझी प्राणप्रीया सकलगुणनिधी चोरुनी या अरण्यीं
नेता तो कोण ? सांगा सकळ मज तुम्ही, शांतवा
प्राणदानीं ॥ ९८ ॥
—अरण्यकांड.

(ख) संस्कृत—' के यूयं, वद, नाथ नाथ किमिदं ? ' दासोस्ति ते
लक्ष्मणः '

*श्रीधर—मज आलिंगितां श्रीरामचंद्र । तेव्हां कंठीं न सोसवेची हार ।
आतां गिरिकाननसमुद्र । दोघांमध्यें पडियेले ॥
—रामविजय, अ० २०.

मोरोपंत—वियोगभीतिस्तव विग्रहातें न लाविता चंद्नलेप हातें; ।
मध्यें नदी पर्वत वृक्ष लक्ष येऊनि, झालासि कसा अलक्ष ॥
—कुशलवाख्यान ४।५७.

‘ कोऽहं वत्स ? ’ ‘ स आर्य एव भगवान् ’ ‘ आर्यः
स को ? ’ ‘ राघवः ’ ।
‘ किं कुर्मो विजने वने ? ’ ‘ तत इतो देवी समावीक्ष्यते’
‘ का देवी ? ’ ‘ जनकाधिराजतनया ’ ‘ हा हा प्रिये
जानकी ’ ॥

मुक्तेश्वर—‘ तुम्ही कोण हो ? ’ ‘ दास तूझा सुमित्रू ’
वदे राम ‘ मी कोण ? ’ ‘ त्रैलोक्यपित्रू ’ ।
‘ नसे काज त्या काननीं ’ ‘ देवि पाहीं ’
म्हणे ‘ कोण ते ? ’ ‘ भूसुता हो ’ ‘ सिते हो !’॥१००॥

—अरण्यकांड.

( ग ) संस्कृत—‘ सौमित्रे ननु सेव्यतां तरुतलं चंडांशुरुज्जृंभते ’
‘ चंडांशोर्निशि का कथा रघुपते चंद्रोयमुन्मीलति’ ।
‘ वत्सैतद्विदितं कथं नु भवता ’ ‘ धत्ते कुरंगं यतः ’
‘ क्वासि प्रेयसि हा कुरंगनयने चंद्रानने जानकि ॥

—प्रसन्नराघव, ६।१.

मुक्तेश्वरी—‘ खडतर मज मित्रा मित्र पोळीत गात्रा
तरुतळवरसंगीं ताप भंगीं पवित्रा ! ’ ।
‘ दिनमणि तव नोहे, चंद्र सारंगचक्री; ’
‘ निरखित हरिणाक्षी; हा सिते ! चंद्रवक्त्री ?’ ॥१०१

—अरण्यकांड.

( घ ) संस्कृत—रे रे ! निर्दय ! दुर्निवार ! मदन ! प्रोत्फुल्लपंकेरुहान्
बाणान् संवृणु, संवृणु, त्यज धनुः किं पौरुषं
मत्प्रति ? ।
कांतासंगवियोगजातहुतभुग्ज्वालाप्रदग्धं वपुः,
शूराणां मृतमारणे न हि परो धर्मो प्रयुक्तो बुधैः ॥

मुक्तेश्वरी—मदन ! कुसुमबाणा सज्ज कोदंड सोडीं
मजवरि धरिसी कां मार ! नाराच–ओढी ? ।

सगुणवधुवियोगें देह दावानळीं, रे,
रणवर मृतमारें कीर्ति नेघे बळी रे ॥ १०३ ॥

—अरण्यकांड.

(ङ) *संस्कृत—' मुद्रे ! ब्रूहि सलक्ष्मणाःकुशलिनःश्रीरामपादाःसुखं "
सन्ति; स्वामिनि ! मा विधेहि विधुरं चेतोऽनया
चिंतया ।
एनां व्याहर देवि ! मैथिलसुते ! नामान्तरेणाधुना,
रामस्त्वद्विरहेण कंकणपदं यस्यै चिरं दत्तवान् ' ॥

मुक्तेश्वरी—' †त्यातें सांगें क्षेमकल्याण मातें
कल्याणाचा धाम जो राम त्यातें ' ॥ ३९ ॥
' ‡रघुपतिपदपद्मीं भृंग सौमित्रि बंधू,
परम कुशल दोघां, सांडिं संतापखेदू ।
ग्रसित स्मरणराहो जानकीभावचंद्रा,
कशित उभयबाहीं कंकणाकार मुद्रा ' ॥ ४० ॥

—सुंदरकांड.

( च ) संस्कृत—'रे रे वानर ! को भवान् ?' 'अहमरे ! त्वत्सूनुहंताहवे
दूतोऽहं खरखंडनस्य जगतां कोदंडदीक्षा गुरोः ।
मद्दोर्दंडकठोरताडनविधौ को वा त्रिकूटाचलः ?
को मेरुः ? क्वच रावणस्य गणना कोटश्च कीटायते ' ॥

मुक्तेश्वरी—' वदत कवण तूं रे ! मर्कटा ! मृत्युकामी ? '
'युकवत तव पुत्रा मारिलें, जाण तो मी; ।

---

* राममुद्रेला ( आंगठीला ) अशोकवनस्थ सीतेनें ' राम व लक्ष्मण खुशाल आहेत ना ? ' म्हणून विचारिलें. तेव्हां मुद्रेनें उत्तर दिलें, " राम व लक्ष्मण सुखी आहेत. त्यांची काळजी तुला नको. परंतु मला तूं आतां ' मुद्रा ' या शब्दानें संबोधूं नको. कारण, तुझ्या विरहानें कृश झालेला राम मला आपल्या अत्यंत कृश झालेल्या हातांत कड्याप्रमाणें घालितो ! " हा श्लोकाचा भावार्थ.

† हा सीतेचा प्रश्न आहे.

‡ हें मुद्रेचें उत्तर होय.

खरजिवहरणाचा दास; दोर्दंडघार्यीं
दलिन त्रिकुट, मेरू; कीटकातुल्य तूंही. ॥ ८० ॥
सुंदरकांड.

( छ ) संस्कृत—'दृष्टा सा जनकात्मजा रघुपते! युष्मत्प्रसादान्मया
लंका नाम पुरी समुद्रजठरे तत्रास्ति वीरप्रभा ।
राहुग्रस्तनिशापतेरिव कला लावण्यहीनप्रभा '।
'सीताजीवनहेतुतां वद कपे !' 'रामामृतं मानसे'॥
मुक्तेश्वरी—सुगम तव प्रसादें जानकी रत्नसृष्टी,
जलधिजठरलंके देखिली दैवदृष्टी ।
ग्रासित वदनचंद्रा क्लेशराहू कळेतें,
जिवनहृदयहेतू रामपीयूष तीतें ॥ १११ ॥
—सुंदरकांड.

( ज ) संस्कृत—[ रामः—' रक्षःपतेः का कथा ' ]
[ मारुतिः— ] ' का शृंगारकथा ? कुतूहलकथा ?
गीतादिविद्याकथा ?
माद्यत्कूलकथा ? तुरंगमकथा ? कोदंडदीक्षाकथा ?
एकैवास्ति मिथः पलायनकथा त्वद्भीतरक्षःपतेर्;
देव श्रीरघुनाथ ! तस्य नगरे स्वप्नेपि नान्या कथा ॥
मुक्तेश्वरी—[ रामः—रावणाची काय कथा ( खबर ) आहे ? ]
[ मारुतिः— ] शृंगार, कौतूहल, गीत, विद्या,
वाजी, करी, कार्मुक; राजवंद्या ।
अष्टौ कथा सांडुनि कामचारी
पलायनाचे पडिले विचारीं. ॥ ११३ ॥
—सुंदरकांड.

( झ ) संस्कृत—यदि नाम दैवगत्या जगदसरोजं कदाचिदपि जातम् ।
अवकरनिकरं विकिरति तत्किं कृकवाकुरिव हंसः ॥
—भर्तृहरि, नीति. १२४
मुक्तेश्वरी—कल्याणठायीं ठेवून मती । ज्ञानी निंद्य कर्मे अव्हेरिती ।
जेंवी मराळ न सेविती । कल्पांतींही गोमय ॥
—सौप्तिक १।१११

( ञ ) संस्कृत—कृमिकुलचितं लालाक्लिन्नं विगंधि जुगुप्सितं
निरुपमरसप्रीत्या खादन् नरास्थि निरामिषम् ॥
नरपतिमपि श्वा पार्श्वस्थं विलोक्य हि शंकते
न हि गणयति क्षुद्रो जन्तुः परिग्रहफल्गुताम् ॥
—भर्तृहरि–नीति. ९

मुक्तेश्वरी—सडलें प्रेताचें पिशित । पूयकृमिदुर्गंधिभरित ।
तें श्वान सेवी त्वरायुक्त । भयें देखें सभोंवतें ॥ १५४ ॥
तेथें भूपही देखतां दृष्टी । ऐसी भावना करी पोटीं ।
माझें आमिष न्यावया निकटीं । येतसे लवलाहें ।१५५।
शुकरंभासंवाद.

( ट ) संस्कृतं—मत्तेभकुंभपरिणाहिनि कुंकुमार्द्रे
कांतापयोधरतटे रसखेदखिन्नः ।
वक्षो निधाय भुजपंजरमध्यवर्ती
धन्यः क्षपां क्षपयति क्षणलब्धनिद्रः ॥
—भर्तृहरि–शृंगारशतक. १७

मुक्तेश्वर—सुरतसंग्रामीं शिणला । मग भुजपंजरीं वाहिला ।
मजऐसीये पहुडला । हृदयडोल्हारा तुजऐसा; ॥२६७॥
कीं मजऐसीये हृदयमाचा । तुजसारिखा नर दैवाचा ।
उशीसी करून उभय कुचां । सुखनिद्रा अनुभवी ।२६८।
शुकरंभासंवाद.

( ठ ) संस्कृत—वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ॥
—रघुवंश. १।१

मुक्तेश्वरी—अर्थी वाचा, वाचेंत अर्थ । ऐसा शिवशक्ति सांगात ।
कौतुकार्थ बोले ग्रंथ । तो भावार्थ परिसिजे. ॥
—आदि. ४।११८.

( ड ) संस्कृत—वंशभवो गुणवानपि संगविशेषेण पूज्यते पुरुषः ।
न हि तुंबीफलविकलो वीणादण्डः प्रयाति माहात्म्यम् ॥
—भामिनीविलास; १.

मुक्तेश्वरी—

कनिष्ठ म्हणे, 'द्रव्यविभाग। माझा मजलागीं ओपीं चांग'
ज्येष्ठ म्हणे, 'एकत्र योग। असतां लोकीं प्रतिष्ठा' ॥ ९२ ॥
तुंबा तंती वेणुदंड। तिघामेळीं विणा सुघड।
मधुरस्वरीं श्रवणीं गोड। नाना लोकां रंजवी ॥ ९३ ॥

—आदि. ५

ढ ) संस्कृत—विदुषां वदनाद् वाचो सहसा यांति नो बहिः।
याताश्चेन्न परांचन्ति द्विरदानां रदा यथा ॥

—भामिनीविलास.

मुक्तेश्वरी—

कुंजरदशन वाढतां पुढें। ते लोटितां नव्हती मागिलेकडे।
सज्जनवचन तेणें पाडें। पालटों नेणे कल्पान्तीं. ॥ १४६ ॥

—आदि. ४१

(ण) संस्कृत—आज्ञा कीर्तिः पालनं ब्राह्मणानां
दानं भोगो मित्रसंरक्षणं च।
येषामेते षड्गुणा न प्रवृत्ताः
कोर्थस्तेषां पार्थिवोपाश्रयेण ॥

—भर्तृहरि-नीति.

मुक्तेश्वरी—

आज्ञा, किर्ति, द्विजपालन। दान, भोग, मित्रसंरक्षण ॥
साही गुणीं तव प्रधान। सालंकार असती कीं ? ॥ २० ॥

—सभा. ३

( त ) संस्कृत—

क्वचित्प्रभा चांद्रमसी तमोभिश्छायाविलीनैः शबलीकृतेव।
अन्यत्र शुभ्रा शरदभ्रलेखा रन्ध्रेष्विवालक्ष्यनभःप्रदेशा ।५६।
क्वचिच्च कृष्णोरगभूषणेव भस्मांगरागा तनुरीश्वरस्य।
पश्यानवद्यांगि विभाति गंगा भिन्नप्रवाहा यमुनातरंगैः ५७

—रघुवंश १३.

मुक्तेश्वरी—

यमुनाजळावरी जान्हवीजळ । धांवें जैसें शुद्ध धवळ; ।
कीं नीळ गगनावरी सोज्वळ । पसरे निर्मळ चांदणें ॥ ६७ ॥
तैसी पातळ चंदनउटी । तेणें शोभला कृष्ण जगजेठी; ।
जवादी भरूनी पर्णकुटीं । सुगंधचूर्ण उधळिलें ॥ ६८ ॥

—सभा. १०

हे उतारे फार झाले; म्हणून त्यांची संख्या आणखी फुगवीत नाहीं. परंतु बहुश्रुत वाचकांना याहून आणखी कितीतरी उदाहरणें शोधून काढतां येतील. शुकरंभासंवादांतील विषयविडंबन, विषयप्रशस्ति, स्त्रियांचा साज, हरिश्चंद्राख्यानांतील कण्वाश्रमाचें वर्णन, रामायणांतील युद्धकांडाच्या अखेरचें रामराज्याचें कौतुक, भारती पर्वांतील ठिकठिकाणचीं सैन्यवर्णनें, संभाषणांतील कोटिक्रम, अप्रस्तुतप्रशंसा, उपमारूपकें, हीं सर्व स्थळें लक्ष्यपूर्वक निरीक्षण केलीं असतां, कालिदासजयदेवबाणभर्तृहरिप्रभृति संस्कृत कवींच्या सुप्रसिद्ध वचनांशीं अर्थ व शब्द या दोन्ही बाबतींत सदृश असणारीं अनेक मुक्तेश्वरी पद्यें आढळल्यावांचून राहणार नाहींत. वरील उदाहरणांकडे नीट पाहिलें असतां, असें नजरेस येईल, कीं, कित्येक संस्कृत पद्यांचें मुक्तेश्वरांनीं शब्दशः भाषांतरच केलें आहे. बऱ्याच ठिकाणीं त्यांनीं संस्कृत कवींची कल्पना जराशी वळवून, आपल्या वर्णनप्रवाहांत सोडून दिली आहे. बाकीच्या उदाहरणांत संस्कृत व मुक्तेश्वरी पद्यांतील शब्दार्थसादृश्य इतकें ढोबळ नाहीं. हे अर्थसादृश्याचे नमुने ह्मणजे मुक्तेश्वरांना कालिदासजगन्नाथभर्तृहरिप्रभृति कवींची कितपत ओखळ होती या मुद्द्यासंबंधानें अत्यंत विश्वासू साक्षीदार होत, व त्यांचा पुरावा या मुद्द्याचा निकाल लावण्याला अगदीं पुरेसा आहे.

## १३ कल्पनासादृश्याचें अपरिहार्यत्व.

येथें हें लक्ष्यांत धरिलें पाहिजे, कीं, सारख्याच प्रसंगांचीं वर्णनें अनेक कवि करीत असले, ह्मणजे त्यांना सारख्याच कल्पना स्वतंत्र रीतीनें सुचणें, हें मुळीं मानवी बुद्धि व कल्पकशक्ति यांच्या स्वरूपानेंच अपरिहरणीय झालें आहे. वावडी वातावरणांत कितीही उंच तरंगो, तिला बांधलेल्या दोरीच्या योगानें तिचा संबंध वावडी उडविणाराशीं राहतोच, व त्याच्या किंवा पृथ्वीच्या आकर्षणानें त्या वावडीला कमीजास्ती काळानंतर आपली सर्व भरारी टाकून खालीं भूलोकीं येणें प्राप्त आहे;

त्याप्रमाणेंच कवीची बुद्धि कितीही विशाल व तीव्र असो, त्याची कल्पकता कितीही उंच भरारो, ती ज्या सूत्रानें सृष्टीशीं निगडित झाली आहे, तें कधींही तुटत नाहीं, व तीवरील मानवसमाजाचें—कवीच्या परिस्थितीचें—आकर्षण कधींही खळत नाहीं. दारूचा नळा डागला ह्मणजे सुरसुर करीत त्यांतून जो तेजाचा झोत तोऱ्यानें वर उडतो, व नानापरींचे रंग व सुवर्णकुसुमांचे नाच दाखवितो, तो अखेर त्या नळ्याजवळच येऊन लयाला जातो, तद्वत् कवीच्या लांब लांब सराळ्या व उंच उंच भराऱ्या, यांची अखेर, त्याच्या परिस्थितींत, मानवसमाजांत, व सभोंवतालच्या वस्तूंत, झाल्यावांचून राहत नाहीं. तेव्हां एकाच देशांतील कवींच्या एकाच प्रसंगींच्या वर्णनांत सादृश्य येणें अपरिहार्य आहे. भिन्न भिन्न संस्कृत कवींचीं काव्यें पाहिलीं, ह्मणजे ही गोष्ट तत्काळ पटते. निरनिराळ्या देशांतही समाजास्थितींत, सृष्टिरचनेंत, मानवेतिहासांत, व मनुष्यस्वभावांत, समान बाबी अनेक असतात. इंग्लिश, फार्सी, मराठी, व संस्कृत, कवींच्या कल्पनांत अनेकवार जें विलक्षण कौतुकजनक साम्य आढळून येतें, त्याचें कारण तरी वरील तत्त्वांतच आहे. रा. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या निबंधमालेंत इंग्रजी व संस्कृत ग्रथांतील अनेक समानार्थक स्थळें नमूद केलीं आहेत, तीं पाहिलीं, म्हणजे वरील तत्त्व तेव्हांच हृदयांत बिंबेल. नवीन कवि काव्य करूं लागला, म्हणजे त्याच्या बुद्धीवर ज्या पूर्व कवींच्या काव्यांचा विशेष संस्कार झाला असेल, त्यांच्याच कल्पना त्याच्या मनांत प्रसंगोपात्त लवकर उद्भवणें अगदीं साहजिक आहे; परंतु ही ‘ कल्पना दुसऱ्याची आहे, ही आपल्याला नको, ’ असें तो म्हणेल, तर त्याला आपल्या काव्याला मुद्दाम उद्रेखून कृत्रिम व रांगडें स्वरूप द्यावें लागेल, व कदाचित् अदृष्टपूर्व कल्पनेच्या अभावानें त्याला आपल्या काव्यग्रंथनाला अजीबात टाळाच द्यावा लागेल. आमचे प्राकृत कवि या बाबतींत अगदीं खुल्या दिलानें बोलतात.

**व्यास वाढितां जगातें । ग्रास लाधला जीर्ण कवींतें ।**
**त्यांचे मुखींचीं उच्छिष्ट शितें । म्यां दुर्बळें वेंचिलीं ॥ १७५ ॥**
**कितीएकांसीं आग्रह मोठा । नातळों म्हणती कविउच्छिष्टा ।**
**हा समर्थवाद योग्य श्रेष्ठा । ईश्वरकृपा म्हणोनी ॥ १७७ ॥**
**एकएक अक्षरांची भीक । जीर्ण कवींतें मागून देख ।**
**मी सर्वज्ञ कविनायक । ऐसें म्हणविलें लौकिकीं ॥ १७९ ॥**

—सभापर्व, ५

वस्तुतः मराठी कवींची—विशेषतः तृतीय वर्गांतील ग्रंथ रचणाऱ्या कवींची—स्थिति यासंबंधें जरा चमत्कारिक आहे. रामायण, महाभारत, भागवत, व इतर पुराणग्रंथ, यांवर त्यांची सर्व इमारत उभारलेली. तींच तींच आख्यानें, तींच तींच वर्णनें, तीच तीच परिस्थिति, पुराणेतर संस्कृत काव्याशींही बहुतेक सारखाच परिचय, मग त्यांच्या ग्रंथांत वर्णनसादृश्याचे—किंबहुना शब्दसादृश्याचे—नमुने शेंकडों सांपडले, तरी त्यांत फारसें नवल नाहीं. म्हणून, वर जे संस्कृत श्लोकांशीं जुळणाऱ्या मुक्तेश्वरी पद्यांचे दाखले दिले आहेत, त्यांत मुक्तेश्वरांची कवि या नात्यानें जी किंमत असेल, ती कमी करण्याचा हेतु आहे. असें कोणालाही समजण्याचें कारण नाहीं. शिवाय, भाषांतरांतसुद्धां कवीला आपली रसिकता, सारासारज्ञान, स्वत्वाचें भान, व भाषाप्रभुत्व, हीं दाखवितां येतात, हे विसरतां कामा नये.

## १४ मुक्तेश्वरी काव्यसंपत्ति.

मुक्तेश्वराचे *नांवानें मोडणारीं आज मितीस उपलब्ध व काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालेलीं † प्रकरणें पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

×( १ ) संक्षेपरामायण ( उत्तरकांडासह. यालाच कोणी कौतूहलरामायण म्हणतात. )—ग्रंथसंख्या १७२५

| | | |
|---|---|---|
| * | ( २ ) आदिपर्व. ... ... ... ... ... | ७१२३ |
| * | ( ३ ) सभापर्व. ... ... ... ... ... | २७०० |
| * | ( ४ ) वनपर्व ( हरिश्चंद्राख्यानासह. ) ... ... ... | ३३७३ |
| * | ( ५ ) विराटपर्व. ... ... ... ... ... | ९९१ |
| * | ( ६ ) सौप्तिकपर्व. ... ... ... ... ... | ५०० |
| × | ( ७ ) समपद्य गीताटीका ... ... ... ... ... | ७०८ |
| × | ( ८ ) मूर्खांचीं लक्षणें.... ... ... ... ... ... | ११३ |

* 'नांवानें मोडणारीं प्रकरणें' असें म्हणण्याचें कारण हें कीं, 'भारद्वाजांच्या' 'केसरीं'तील एका पत्रावरून असें कळतें कीं, 'मुक्तेश्वर नागनाथ क्षीरसागर' या नांवाचा, प्रस्तुतनिबंधविषयक मुक्तेश्वराहून भिन्न, असा एक कवि होऊन गेला आहे. तेव्हां कित्येक किरकोळ प्रकरणें व पदें वगैरे, जीं प्रसिद्ध मुक्तेश्वरांच्या नांवावर मोडतात तीं वस्तुतः या मुक्तेश्वर क्षीरसागराचीं असणें संभवनीय आहे. परंतु यासंबंधें निश्चयात्मक विधान करण्याला अद्याप कांहींएक साधन उपलब्ध नाहीं.

† ज्या प्रकरणांच्या मागें *अशी फुली आहे, तीं प्रतिभाशाली, प्रसादपूर्ण, व हृदयंगम, आहेत, असें समजावें. ज्यांच्या मागें × अशी खूण आहे, तीं दुय्यम दर्जाचीं, व † अशी खूण आहे, तीं कनिष्ठ दर्जाचीं, काव्यें होत.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| * ( ९ ) शुकरंभासंवाद. | ... | ... | ... | ... | ... | ४६७ |
| * ( १० ) शतमुखरावणवध. | ... | ... | ... | ... | ... | १३३ |
| † ( ११ ) एकनाथचरित्र. ... | ... | ... | ... | ... | ... | ९४ |
| † ( १२ ) गजेंद्रमोक्ष. ... | ... | ... | ... | ... | ... | ३६ |
| † ( १३ ) विश्वामित्रभोजन | ... | ... | ... | ... | ... | ४५ |
| † ( १५ ) दुर्योधनशल्यस्फोट | ... | ... | ... | ... | ... | ७१ |
| † ( १५ ) अर्जुनकामपूर्ति. | ... | ... | ... | ... | ... | ५६ |
| † ( १६ ) हनुमन्ताख्यान. | ... | ... | ... | ... | ... | ६२ |
| * ( १७ ) आरत्या, पदें इत्यादि | ... | ... | ... | ... | ... | १७ |

एकूण संख्या १८, २१४

यांशिवाय मुक्तेश्वरांनीं ओंवीबद्ध ' भागवत ' रचिलें आहे. असें रा. गोडबोले व नवनीतकार म्हणतात, व रा. वामनराव ओकांनीं नाशिकास कोणाजवळ हा ग्रंथ असल्याचें ऐकल्यावरून तो मिळविण्याची फार खटपट केली, परंतु तींत यश आलें नाहीं, असेंही समजतें. तसेंच मुक्तेश्वरी भारताची विराटपर्वापुढील चवदा पर्वेंही कोठें उपलब्ध नाहींत व तीं सर्व कोणातरी दुष्टानें बुडविलीं अशी आख्यायिका आहे. मुक्तेश्वरासारख्या नामांकित कवींचीं भागवतभारतासारखी अवाढव्य, अत्यंत गोड, व रसाळ, काव्यें अजिबात नाहींशी व्हावींत, हें फार चमत्कारिक आहे; परंतु अलीकडे मुक्तेश्वरांचें सौप्तिकपर्व सांपडल्यापासून वरील चमत्कारिक गोष्टही खरी असावी, असें वाटूं लागलें आहे. रा. गोडबोल्यांनीं मुक्तेश्वरांचा वत्सलाहरण नांवाचा ग्रंथ असल्याचें लिहिलें आहे, परंतु तो ग्रंथ कोठेंही पाहण्यांत येत * नाहीं.

*मुक्तेश्वरांचा ग्रंथांच्या बाबतींत योगायोग कांहीं विलक्षण आहे. भागवत, सबंध भारत, वत्सलाहरण वगैरे काव्यें त्यांनीं लिहिलीं अशी प्रसिद्धि असून, तीं उपलब्ध होत नाहींत, तर त्यांचीं कांहीं काव्यें उपलब्ध व प्रकाशित असूनही, त्यांची कित्येक नाणावलेल्या महाराष्ट्र काव्यवाचकांस व ग्रंथकारांस दादही नाहीं. निबंधचंद्रिकाकारांनीं इ. स. १८८६ सालीं ४० व्या अंकांत नवनीतकारांना उद्देशून पुढील उद्गार काढिलेले आढळतातः— ' मुक्तेश्वरानें प्राकृत रामायणही केलें आहे, अशी प्रसिद्धि आहे, परंतु तो ग्रंथ सांपडत नाहीं असें नवनीताची सांप्रतची आवृत्ति प्रसिद्ध करणारे म्हणतात. नवनीतासारख्या मराठी ग्रंथाचे प्रकाशक, दक्षिणाप्राइझ कमिटीचे सेक्रेटरी, व विद्याखात्यांतील मराठी ट्रान्सलेटर साहेबच जर असें म्हणूं लागले तर बोलणेंच राहिलें नाहीं ! वरील वाक्य लिहितेवेळीं शास्त्रीबोवा झोंपेंत तर नसतील ना?' परंतु आश्चर्य हें कीं, निबंधचंद्रिकाकारांनीं केलेल्या या धकाबुक्कीनेंसुद्धां नवनीतप्रकाशकांची झोंपमोड झालेली दिसत नाहीं. कारण नवनीताच्या इ० स० १८८९ सालच्या आवृत्तींतही वरील वाक्य ध्रुवाप्रमाणें अढळपदारूढ झालेलें आढळतें.

## १५ मराठींत श्लोकबद्ध रचना प्रथम कोणी केली ?

रामायणाशिवाय सर्व मुक्तेश्वरी ग्रंथ ओवीछंदांत आहेत. रामायणांत मात्र इंद्रवज्रा, भुजंगप्रयात, शिखरिणी, शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा, अनुष्टुप् , इत्यादि अक्षरगणबद्ध संस्कृत छंदांचाच सर्वत्र उपयोग केलेला आढळतो. प्रथमतः हे छंद मराठींत वामनानें आणिले, असें निबंधमालाकारांनीं विधान केलें होतें; परंतु तें म्हणणें खोडून काढून, या बाबतींत अग्रतिलकाचा मान मालाकारांच्या आक्षेपकांनीं मुक्तेश्वरास दिला. त्यावर महाराष्ट्रकवीनें नागजोशांचा सीतास्वयंवर छापून, अक्षरगणबद्ध छंदोरचनेचें अध्वर्युत्व त्यांकडे लादलें. नंतर रा. राजवाडे यांनीं एक मानभावी काव्य—गद्यराज—ग्रंथमालेंत छापिलें. हें कृष्णलीलाविषयक काव्य हयग्रीवाचार्यनामक महानुभाव कवीचें आहे. या कवीचा जन्मशक ११९७ (इ. स. १२७६ ) आहे. यानंतर अगदीं अलींकडे महाराष्ट्रसारस्वतकार रा. भावे यांना पुष्कळ मानभावी वाङमय उपलब्ध झालें आहे, व त्यांत ज्ञानदेवकालीन कवींच्या हातची श्लोकरचना आढळांत येते. म्हणजे संस्कृत छंद मराठींत आणण्याचे कामीं अग्रेसरत्वाचें भूषण ज्ञानदेवकालीन मानभावांच्या गळीं पडूं पाहतें. पण आमच्या मतें हा वाद केवळ शुष्क आहे. प्राकृत भाषेचा उद्गम संस्कृतांतून आहे, व त्या भाषेंत संस्कृतांतील अक्षरगणबद्ध छंदांत काव्यरचना केलेली आढळते; आणि प्राकृतापासूनच जर मराठीचा उदय झाला असें मानावयाचें, तर तींत संस्कृतांतील छंद प्राकृतद्वारा किंवा प्रत्यक्षरीतीनें आरंभापासूनच थोडेबहुत येणें साहजिक आहे. तेव्हां या यशःश्रीची माळ एकाद्या कवीच्या गळ्यांत चिरकाळ टिकेल, असें आम्हांला वाटत नाहीं. यमकाच्या मुद्दयाचाही असाच निकाल करावा लागेल. वामन व विठ्ठल यांचेच समकालीन मुक्तेश्वर होते. मुक्तेश्वरांनीं आपल्या रामायणांत निरनिराळ्या तऱ्हेचीं यमकें, व अनुप्रास, व बंधही साधिले आहेत. वामन व विठ्ठल यांनीं अंत्य यमकें व कांहीं चित्रबंध रचिले आहेत, परंतु त्यांशिवाय इतर यमकांचे प्रकार त्यांच्या काव्यांत दिसून येत नाहींत. मुक्तेश्वरांनीं अंत्ययमक सोडून देऊन, *मध्येंच कांहीं विशेष पद्धतीचें यमक साधिलें आहे; यांचीं दोन उदाहरणें देतोंः—

**( अ ) पुढती दुष्ट पाताळीं जात मेळीं खळांचिये,।**
**पातालनगरीं रामा दिव्यधामा विलोकल्या ॥ १४४ ॥**

* अशा तऱ्हेचे यमकप्रकार मानभावी काव्यांत विपुल सांपडतात.

**वैडूर्यतोरणाकीर्णा, सुविस्तीर्णा, सुवेदिका, ।**
**सुवर्णस्तंभ पोटाळीं मुक्तजाळी सुकिंकिणी ॥ १४५ ॥**
**वज्रस्फाटिक सोपानें, दीप्तिमानें, मनोरमें, ।**
**पाचुबंधी मही शोभे शातकुंभें सुचित्रता ॥ १४६ ॥**

—उत्तरकांड.

**(आ) मायास्त्रातें सोडितां मेघनादें, झाली अंधें मानसें या जनाचीं।**
**त्यातें ग्रासूं प्रेरिली ब्रह्मविद्या, योगीवंद्या जानकीनाथमित्रें २३०**
**बारा सूर्यो मीनले एक ठायीं, ज्याच्या घायीं वज्रधारा दुखंडे, ।**
**तेणें बाणें ताडिलें मेघनादा, केलें छेदा सर्व गात्रांसि तेणें ॥२३१॥**

—युद्धकांड.

पहिल्या तऱ्हेनें यमकें साधून रचिलेले अनुष्टुप् श्लोक मुक्तेश्वरांच्या रामायणांत जवळ जवळ पावणेदोनशें आहेत. अंत्ययमक झुगारून देऊन असें गर्भित यमक साधण्याची क्लृप्ति नामजोशी, विठ्ठल, व वामन यांस सुचलेली दिसत नाहीं; परंतु गद्यराज ग्रंथांत अशाच प्रकारचें यमक बऱ्याच ठिकाणी आढळतात. त्यांत कांहीं श्लोकांत अंत्ययमक आणून शिवाय तेंच यमक प्रत्येक यतीवर साधिलें आहे. म्हणजे अर्थात् निरनिराळे बंध रचिले आहेत. परंतु बऱ्याच श्लोकांत अंत्ययमकाला अर्धचंद्र देऊन, प्रत्येक चरणांतील यतीवर मात्र यमक आणिले आहेत. ज्ञानदेवकालीन मानभावी काव्यांतही अशीं यमकें आढळतात. तेव्हां आजमितीस तरी यमकाच्या बाबतींतही अग्रपूजेला आपलें मस्तक पुढें करण्याचा अधिकार मानभावांसच आहे. परंतु या प्रकरणाचा कायमचा निकाल लाविणें अशक्य आहे. तरी पण प्रत्येकास हें कबूल करावें लागेल कीं, महाराष्ट्र वाचकांवर वामनांच्या दीर्घ यमकांनीं व श्रवणमधुर छंदोरचनेनें जितका दृढ व गाढ संस्कार केला, तितका त्यांच्यापूर्वी कोणीही केलेला नाहीं.

## १६ मुक्तेश्वर व यमकें.

निबंधचंद्रिकाकार आपल्या मुक्तेश्वरावरील निबंधांत म्हणतात, कीं, "यमकासाठीं कवीनें ओढाताण केलेली फारशी दिसत नाहीं. फार तर काय पण रामायणांतसुद्धां यमकांत दोहींपेक्षां जास्त अक्षरें वाचकांस सांपडणार नाहींत. श्लेषाची रचना कोठें (ही) नाहीं" मुक्तेश्वरांची बरीच कविता ओवीबद्ध असल्यामुळें त्यांस यमकासाठीं

फारशी ओढाताण करावी लागली नाहीं, ही गोष्ट खरी आहे. परंतु हें विधान ओवीबद्ध रचना करणाऱ्या बहुतेक सर्व कवींना इतक्याच जोरानें लावितां येईल. यांत मुक्तेश्वराचेंच विशेष कौशल्य दिसून येत नाहीं. ओवीला अक्षरें व गण यांचें घट्ट निबंधन नसल्यामुळें, वाक्प्रवाहाला फारसा आळा न घालतां, साधारण यमकें साधितां येतात. मुक्तेश्वरांप्रमाणेंच ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, दासोपंत, रामदास, शुभानंद नरहरि, ह्यांनींही आपल्या ओवीबद्ध ग्रंथांत केवळ यमकांकरितांच ओढाताण केली आहे, असें कोठेंही नजरेस येणार नाहीं. यमक साधण्याची हतोटी व हौस ह्या अक्षरगणवृत्तांत मात्र खऱ्या कसोटीस लागतात, व तेथेंही फारशी ओढाताण न करितां यमकें व बंधप्रबंध साधणें, यांत खरें खरें भाषाप्रभुत्व व रचनाचातुर्य हीं अनुभवास येणार आहेत. यमकानुप्रासादि शब्दालंकार साधणें म्हणजे अरसिकतेचें किंवा हीनरुचीचें चिन्ह आहे, असें आम्हांस म्हणवत नाहीं. यमक, अनुप्रास, इत्यादि शब्दालंकार स्वतःच कर्णमनोहर असल्यामुळें, ते कौतुकजनक व आनंदोत्पादक होतात; तशांत हे शब्दचमत्कार अर्थरसहानि न होऊं देतां साधले असतील, तर त्यांनीं कवीविषयीं आदरविशेषही उत्पन्न होतो. अर्थरसानुकूल अनुप्रास, यमक, छंद, व रचनापद्धति, असेल, तर दुधांत साखर पडल्यासारखेंच होतें. हीं सर्व कवितेचीं बाह्यांगें होत, व तीं अंतरंगाला जितकीं जितकीं पोषक होतील, तितकीं तितकीं चांगलींच, हें उघड आहे. पण त्यांत विरोध येईल, तर मात्र अंतरंगाला प्राधान्य देणेंच रास्त आहे. भपक्यांत किंवा डामडौलांत श्रीमंती किंवा गुणसर्वस्व नाहीं, हे कबूल केलेंच पाहिजे; तरी पण लक्ष्मीपुत्रानें आपल्या अंगावर वातेरेंच घ्यावें, किंवा विशालबुद्धीच्या डोक्यावर गळ्वांत पट्या येणारेंच पागोटें असावें, असें म्हणणें रास्त नाहीं; असा लक्ष्मीपुत्र आपल्या तिरस्कारास, व असा विद्वच्छिरोमणी आपल्या करुणेस, पात्र होईल, हें उघड आहे. 'जरि उकिरड्यांत पडला, मळला, न हिरा तथापि सामान्य' हें तत्व जरी मान्य केलें, तरी त्या हिऱ्याची खरी किंमत प्रगट होण्यास, त्याची शोभा व चमक ह्यांचें चीज होण्यास, त्याला उकिरड्यांतून काढणें, साफ करणें, व कोंदणांत बसविणें, हेंच अवश्य आहे, हेंही ध्यानांत धरणें बरें. एकंदरींत कवीनें आपली उज्ज्वल कल्पना उज्ज्वल भाषावेषानें सजाविणें अगदीं जरूर आहे. तिच्या अंगावर आपल्या ऐपतीप्रमाणें अनुप्रासयमकादिकांचे दागदागिने चढविणेंही दोषास्पद नाहीं. मुक्तेश्वरांनीं आपल्या रामायणांत कवितावधूचे शब्दालंकारांसंबंधें बहुतेक सर्व सोहळे

पुरविले आहेत. †पांचपंचवीस पद्यांत तर त्यांनीं आपल्या कवितेला अलंकारांनीं गुदमरवून टाकून, तिला अगदीं सळो कीं पळो करून सोडिलें आहे. पण इतरत्र त्यांनीं सर्व कांडांत साधीं एकाक्षरी यमकें व सहज साधलेले अनुप्रास, यांनीं आपली रचना चांगली मोहक केलेली आहे. याकरितां त्यांनीं फारसा आटापेट केलेला नाहीं; परंतु त्यांच्या वाक्प्रवाहाला मुळीं अक्षरगणवृत्तांचें बंधनच मानवलेलें दिसत नाहीं. यमकानुप्रासापेक्षां या बंधनानेंच त्यांच्या वाग्विलासाला बराच अडथळा झालेला आढळतो. त्यांच्या रामायणांत जी शब्दांची ओढाताण, चेंगराचेंगर, व ताटातूट, झालेली दृग्गोचर होते, तिला कारण संस्कृत छंदांचीं विटाळें होत, यमकानुप्रासांचीं किटाळें नव्हत. संस्कृत छंदांना जरूर तितका लवचीकपणा त्यांच्या भाषेंत नसल्यामुळें, छंदाच्या साच्यांत बसण्यासाठीं तींतील शब्दांच्या माना मुरगळणें, किंवा हस्तपादादि अवयव छाटणें, ऱ्हस्वदीर्घांचा पंक्तिप्रपंच सोडून देणें, सामासिकांत अरेरावीपणानें भेद पाडणें, व्याकरण नियमांना धाब्यावर बसविणें, इत्यादि गोष्टी मुक्तेश्वरांना भाग पडल्या, व ही स्थिति त्यांच्याही दृष्टोत्पत्तीस आली, असें दिसतें. कारण, रामायणानंतर त्यांनीं कोणतेंही काव्य अक्षरगणवृत्तांत रचण्याचा प्रयत्न केला नाहीं. यावर त्यांनीं आपला सर्व भार ओंवीवर टाकिला, व त्यांची शब्दालंकाराची हौसही जरा आळथांत आली. त्यांच्या ओंवीबद्ध ग्रंथांत शब्दालंकार सहज रीतीनें साधलेले आढळतात. कृत्रिमतेनें रचनेला कोठेंही बेडौलपणा आलेला दिसत नाहीं.

## १७ मुक्तेश्वरांची श्लेषप्रीति.

निबंधचंद्रिकाकार म्हणतात, कीं, मुक्तेश्वरांच्या काव्यांत श्लेष कोठेंही आढळत नाहीं. परंतु हें त्यांचें म्हणणें वस्तुस्थितीस अगदीं सोडून आहे. मोरोपंतांस श्लेषाची जितपत हौस आहे, तितपतच ती मुक्तेश्वरांस असलेली आढळते. आम्ही येथें मुक्तेश्वरांच्या काव्यांतील श्लेषांचीं कांहीं ठोकळ *उदाहरणें सादर करितोंः—

**( अ ) मुनी"मानसीं"नांदसी तूं मराळी,**
**दयाचिद्घनालागिं लक्षी निराळीं ।**

---

† अयोध्याकांड श्लोक १००, १०१. ११०; अरण्यकांड २०, २१ २२, २५; सुंदरकांड ६५, ६६, ११६, अरण्यकांड १३७–१४८, २००, २४५–२५१, २६७, २८०, ३६० इत्यादि.

* या उदाहरणांत अवतरण चिन्हांनीं अंकित शब्द श्लिष्ट आहेत.

कवीचातकें वेधलीं, त्यांसि इच्छा
दुभे शारदे! ज्यापरी धेनुवच्छा ॥ —बाल. १२.

(आ) नळें बांधिजे यापरी सेतुबांधा;
"जडा जीवनीं" जोडिला एक सांधा. ॥
—युद्ध. ४०

(इ) नारीचें नाम "रामा," नरतनु महिमा कोविं पावे विराची?
..........................................................................
तैसा हा राम साचा मखपशुहवनीं जाण नातू "अजाचा." ॥
—युद्ध. १४८.

(उ) जगा "मित्र" जो आजि आम्हां अमित्र,
कुळा घातकी, पातकी काळशत्रू. ॥
—युद्ध. ३२७.

(ऋ) वधूनाम तूझें जगीं रूढ "रामा"! नको वाढवूं वीरवाढीव कामा
—युद्ध. ३७०.

(ऌ) *वसे "दंड" छत्रीं, दिसे "छेद" पत्रीं,
कुलीं "बंध," हो "मारणें," सारियंत्रीं।
वधू सूरतीं येति "संग्रामकाजीं,"
"पिडा" एकि ते कामिनीचे कुचाब्जीं ॥
—युद्ध ४५६.

(ए) गरुड म्हणे, हे सहस्राक्ष!। सर्प होत का माझे भक्ष।
हा एक वर ओपिल्या, मुक्ष। मित्र माझा तूं एक ॥ १०३ ॥
विशेष कश्यपाचा कुमर। होशील वडील सहोदर।
दोघे "खेचरांचे इंद्र"। नामही एक दोघांचें. ॥ १०४ ॥
—आदि. ६.

(ऐ) मुळींच गुरूचें नांव "जीव"। तो केवीं शिष्यातें करील "शिव"।
ऐसें बोलतां लोक सर्व। गुरुनिंदार्थ कल्पिता ॥ २१ ॥
—आदि १७

* युद्धकांडांत या श्लोकापासून पुढें ४६० व्या श्लोकापर्यंत सारखे याच प्रकारचे श्लेष आहेत व या सर्व वर्णनाचें बाणभट्टाच्या कादंबरींतील वर्णनाशीं विलक्षण सादृश्य आहे.

( ओ ) आयकोनी उद्दालकाची वाणी । पुत्र कोपला चौगुणी ।
म्हणे चळला "पद्मयोनी" । विवेकशून्य " चौतोंड्या" १३०
"वंशज होय कर्दमाचा" । "पंकावली" त्याची वाचा ।
म्हणोनिया कश्मलाचा । प्रचार केला लौकिकीं ॥ १३१ ॥
--आदि. २७

(औ) समर्थ पावती तेजहाणी । दूतिका गर्जती निंदावचनीं ।
" पंकोद्भव नीचयोनी " । म्हणोनी कुमुदें हांसती. ॥ १९०॥
—आदि २७

( क ) कीं व्योमनर्मदेमाजी थोर । " कार्तवीर्य सहस्रकर " ।
तारा बाणलिंगाचा भार । निवटोनी करी परौता. ॥ ७९ ॥
—आदि. ३६

(ख) "हृदय" वोपोनी "भगवंतीं" । घारगे घारयाचे प्रीती ।
येऊनी " धर्मयागाप्रती " । प्रिय झाले पितरां ते ॥ १०४ ॥
—सभा. ९

(ग)"अंतरीं" अनुभवाची "गोडी"।म्हणोनी लोक "दृष्टी मुरडी"।
"कानवले" नव्हेची हे विकडी । "का नवलें" प्रपंचीं ॥ ११० ॥
—सभा. ९

(घ) "हृदयीं धरूनियां मान " । तथापि न " सोडावे चरण "
यालागीं आपादकंठलग्न । वैजयंती विराजे । ६१ ॥
—सभा. १०

(ङ) " समुद्रतीरीं " पक्षी अधम । मुखें मिरवी " हंसनाम " ।
पक्षियां उपदेशी स्वधर्म । म्हणे, ' विवेकें वर्तावें ' ॥ १४६ ॥
—सभा. ११

(च) "द्रोण" तो केवळ पर्णद्रोण । आयुष्यआज्यें "माखला पूर्ण" ।
" हातें स्पर्शतां" धृष्टद्युम्न । रणीं " पडेल पालथा " ॥ ८८ ॥
खंडिलया कर्णेंशीं " विकर्ण " । कौरवसेना अवलक्षण ।
प्राणें गेलिया दुर्योधन ॥ मग विरूप अपवित्र ॥ ८९ ॥
—विराट. ७

**(छ) कृष्णपंक्तीचे जेविले जाणा । ते " आंचवले " जन्ममरणा ।**
**" कृष्णरंगीं रंगून वदना " । श्रीकृष्णची झाले मानसें ॥९५॥**

—विराट. ८

असो. अशा तऱ्हेचीं आणखीं पुष्कळ उदाहरणें ठिकठिकाणीं आढळतात, परंतु तीं सर्व देऊन जागा आडविण्यांत मतलब नाहीं. यावरून इतकें सिद्ध आहे कीं, मोरोपंतांप्रमाणेंच मुक्तेश्वरही श्लेषप्रिय आहेत, व ज्या ठिकाणीं सहज जातां जातां श्लेषचमत्कार दाखवितां आला, त्याठिकाणीं दोघांनींही ती संधी बहुधा व्यर्थ दवडूं दिली नाहीं; मात्र, कित्येक संस्कृत कवींप्रमाणें केवळ श्लेषाच्या भरी भरून, पंतांनीं व मुक्तेश्वरांनीं आपलीं काव्यें दुर्बोध व रसहीन केलीं नाहींत, ही गोष्ट अत्यंत समाधानाची आहे. आम्हीं वर जीं मुक्तेश्वरांच्या ग्रंथांतील श्लेषांचीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं किती सुबोध, स्वाभाविक, मार्मिक, रसानुकूल, व मनास चटका लावणारीं, आहेत, हें लक्ष्यांत घेतलें, म्हणजे कवीच्या या मनोहर श्लेषकौशल्याची तारीफ करण्याची स्फूर्ति झाल्यावांचून राहत नाहीं. याशिवाय थोडाबहुत श्लेषांचाच आश्रय करून साधलेले व मनाला चोजविणारे वर्णनचमत्कार, पदलालित्य, यमकं, लाटानुप्रास, इत्यादि शब्दलीलाही फारसे प्रयास न करितां मुक्तेश्वरांनीं मधून मधून, मासल्याकरितां म्हणूनच कीं काय, आपल्या काव्यांत गोंविलेल्या आढळतात. या धोरणाच्या दोन चार स्थळांचा उल्लेख करितोंः—

**( अ ) वर्णपंक्तींचे वर्णाक्षर । शोधोनी काढिती अर्थज्ञ चतुर ।**
**कां तांदुळांत पाकड सत्वर । काढिती निवडून जाणते ॥५८॥**
**हंसपद देवोनी ओळों । उणें अक्षर रेखिजे मौळीं ।**
**तैसे गुणवंत उंचस्थलीं । मानें आणोनी स्थापिले ॥ ५९ ॥**
**मात्रा वेलांटी व्यंजन । " मस्तकीं मानूनी " गुरुसज्जन ।**
**"उकार" होवोनी "अग्रवर्ण" । "पायीं भजे" लीनत्वें ॥६०॥**

—आदि २५

**( आ ) झाडूं कौरवांच्या " पाटी " । प्रगट करूं " जातुषाची कुटी "**
**उगाळून पृथ्वीतटीं । " चंदन करूं " शल्याचें ॥ १६ ॥**
**उघडूं " कर्णाचीं टाळीं " । पाय देऊं भूपाळमौळीं ।**
**प्रतापें जिणोनी पांचाळी । लाज लावूं समस्तां ॥ १७ ॥**

—आदि. ४१

( इ ) खळा आणि कंटकातें । दोन प्रकार बोलिजे येथें ।
"उपानहीं भंगावें" मुख्यत्वें । कीं वर्तणें दूरस्थ ॥ २६ ॥

—आदि ३५

( उ ) रथारोहणीं आगळें बळ । युधिष्ठिर देखोनी कुशल ।
हृदयीं " शल्य " वाहे " शल्य " । निकरें झूज झुजावया २०९

—आदि ३०

( ऋ ) अमरांअसुरांसारिखें थोर । युद्ध मांडिलें घोरांदर ।
हें देखोनी *मंदाकिनीचा कुमर । वरिता झाला वीरश्री ॥ १२८
त्यागूनी ब्रह्मचर्यनियमा । तियेसी रातला जारकर्मा ।
परांगना राजप्रतिमा । "वीर्यपंकें लेपिल्या" ॥ १२९ ॥

—आदि २३.

( ऌ ) तो कर्णनामा जिंकोनी युद्धीं । अपार घेतली धनसमृद्धी ।
" पर्वत-वासीय " लक्षावधी । " पर्वत " देती द्रव्याचे ॥ ६७ ॥
आतां "दक्षिणेप्रती" "दक्षिणा" । द्यावया माद्रीच्या नंदना ।
प्रेरिलें त्या निरूपणा । कुलभूषणा ! अवधारीं ॥ ७६ ॥

—सभा. ८

( ए ) धर्म तो सर्वगुणीं "पूज्य" । म्हणोनी लोकपूज्यातें "पूज्य"।
दुःखशोकां पाडिलें "पूज्य" । म्हणोनी लोकांतें "पूज्य" तो २०

—सभा. ९

( ओ ) आमुच्या खड्गाचिया मुष्टीं । मर्दूं कौरवांच्या थाटी ।
" त्रिगर्तातें " भूतळवटीं । " पाताळगर्ता " दाखवूं ॥ ६२ ॥

—विराट. ५

( औ ) जयातें " नगाचें " अभिधान । " नगरीचा " प्रियनंदन ।
अंगनावेषें हा अर्जुन । वोळखिला, वोळख तूं ॥ ६० ॥

—विराट. ६

( क ) पवित्र† शीतल जीवनी माथां " मंदाकिनी " ।
कंठीं धरिला " वन्ही " । नवल काय ? ॥

---

* ब्रह्मचारी भीष्म.

† या ठिकाणीं कवीनें श्लेषप्रीतिस्तव अश्लीलत्वाचाही दोष पतकरिला आहे.

**" गरुडारूढ " मधुसूदन हृदयीं वसे पूर्ण ।**
**कंठीं " सर्पाभरण " नवल काय ?॥**
**" सिंहावरी " वोळंगत अंकीं गिरिजा स्वस्थ ।**
**मारिला " कुंजर " दैत्य ! नवल काय ?॥**
**अहो लीला विश्वंभरा कृपामूर्ती " जगदोद्धारा " ।**
**तारिसी " मुक्तेश्वरा " ! नवल काय ? ॥**

मुक्तेश्वरांच्या आरत्या व पदें तर यमकानुप्रासांनीं अगदीं दाटलीं आहेत; परंतु तेथें मात्रागणाचे बंधन आल्यामुळें ऱ्हस्वदीर्घासंबंधें कवीनें पदोपदीं शैथिल्य चमकाविलें आहे.

## १८ मुक्तेश्वरी काव्याचें गुणगौरव.

इतका वेळ मुक्तेश्वरांच्या भाषापद्धतीचा शब्दचमत्कारासंबंधानेंच ऊहापोह केला; आतां तिच्या इतर गुणावगुणाचें विवेचन करावयाचें. मुक्तेश्वरांच्या वाणीचा प्रभाव त्यांच्या कोणत्याही मोठ्या ग्रंथांत अनुभवास आल्यावांचून राहणार नाहीं; परंतु रामायणांत मात्र तिचें खरें दिव्य स्वरूप प्रतीत होत नाहीं; याचें कारण इतकेंच, कीं त्यांतील ऱ्हस्वदीर्घासंबंधानें जो शिथिलपणा पदोपदीं आढळून येतो, त्यानें मन विरस होऊन जातें. परंतु ही भाषाशुद्धतेसंबंधींची बेपर्वाई, त्याकालच्या बहुतेक सर्व नामांकित कवींमध्यें दृग्गोचर होते. रामदास, तुकाराम, रंगनाथ, यमक्या वामन, विठ्ठल, अनंत, वगैरे तत्कालीन ज्या ज्या कवींनीं अक्षरगणवृत्तांत रचना केली, ते ते कवी वरील दोषाच्या परिष्कारांतून निसटलेले दिसत नाहींत. भाषा अभियुक्त होण्याला, तिच्या घटनेंत बराच ठामपणा येणें, व ती नियमबद्ध होणें, जरूर आहे. या गोष्टीकडे कटाक्ष ठेविला असतां, महाराष्ट्रकविमालेंत मेरुमणिस्थान सरस्वतीप्रिय मयूरेश्वरास दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं. पण भाषेच्या अंगीं चमक, तडफ, आवेश, व भेदकपणा, हीं प्रथमच पूर्णपणें बिंबविल्याचें श्रेय तुकाराम, रामदास, व मुक्तेश्वर, यांच्याच वांट्यास येणार आहे. त्यांच्या पूर्वीं ही कामगिरी इतुकी चोख रीतीनें कोणीही बजाविली नाहीं, व त्यांच्यामागूनही मोरोपंताशिवाय दुसऱ्या कोणाच्या अंगीं हें कसब तेवढें उत्कटत्वानें वसत असलेलें आढळत नाहीं. कोमलता, प्रेमळपणा, विनय, व माधुर्य, ह्या गुणांचें महाराष्ट्रीला बाळकडूच घातलेलें आहे. ज्ञानेश्वरांपासून तों तहत् रामजोशांपर्यंत सर्व नामांकित कवींमध्यें हे गुण सामा-

न्यतः आढळतात. पण तींत क्षात्रतेजाचा बार भरण्याचें काम प्रथम या सतराव्या शतकांतील कवींनीं केलें. अशाच तऱ्हेची बाणेदार क्षात्र ओजाची ऐट अठराव्या शतकांतील लावण्यापोवाड्यांतही प्रत्ययास येते. मुक्तेश्वरांच्या भाषेंतील ही तडफ व आवेश, हीं रामायणी युद्धकांडांत, व भारती पर्वांतील ठिकठिकाणच्या युद्धप्रसंगांत, वाचकांचे बाहु स्फुरवितात व मनोवृत्तीचें आस्फालन घडवितात. प्रत्येक शब्दाबरोबर जणूं काय हत्तींच्या थडका व घोड्यांच्या टापा, वीरांचे सिंहदान व चापांचे टणत्कार, रथांचा गडगडाट व अस्त्रांचा कडकडाट, मल्लांचा दंडस्फोट व गदांचा दणगा, हीं आपल्या श्रुतिरंध्रावर आदळत आहेत, असाच भास होतो.

## १९ वीररसोत्कर्षाचे प्रसंग.

रामदासांप्रमाणेंच मुक्तेश्वरांच्या रामायणांतही युद्धप्रसंगीं बहुशः भुजंगप्रयात वृत्ताचाच अवलंब केलेला आढळतो. हें वृत्त रणघाईस रणवाद्याप्रमाणेंच खुलतें. त्याचा प्रत्येक पावटा रणस्फुरण पावून चवताळलेल्या घोड्याप्रमाणेंच थयथयाट करतो. त्यांतील उद्दामपणा व आवेश हे लष्करी बाण्याला सर्वथैव अनुरूप आहेत. मालिनीवृत्तही याच मासल्याचें आहे. यासंबंधें मुक्तेश्वरी रामायणांतील पुढील स्थळें वाचकांनीं अवश्य वाचावीं. अरण्यकांड २९–४१; किष्किंधाकांड ४९–५८, ९६–१०१; २५–३१, ५०–७३. युद्धकांडांत तर अशी वीररसोत्कर्षाचीं स्थळें अनेक आहेत. ८२–१३४ या त्रेपन्न श्लोकांत पहिलाच युद्धप्रसंग वर्णिला आहे. त्यांतील कांहीं श्लोक नमुन्यास्तव खालीं देतोंः—

**दळें मीनलीं सन्मुखें येर येरा,**
**निघातें भयें खोकरे भूतडेरा; ।**
**निघे गाजती त्या ध्वनी मेघ सानें,**
**दिशाकुंजर घाबिरे घेति रानें ॥ १०४ ॥**
**‘ भला मारि घे; पाठि दे धीर धीरा !**
**छळें हांकितां, माजले वीर सैरा; ।**
**तडाडे, धडाडे सुडें घाय गाढे;**
**धडा ताडितां, मोडिती हाडमोडे ॥ १०५॥**
**गिरीशैल शृंगी शिलावृक्ष मारे,**
**अरी वल्लरी बाणधारी सुभारें, ।**

शिसें तूटती, फूटती नारिकेळें;
सरी इक्षुदंडा पदें पाणिजाळें ॥ १०६ ॥
हुली घालिती, टाकिती शस्त्र ओढा;
सरी एकटी सौदणी घेत होडा; ।
विरांचीं शिरें चेंडुवांतुल्य पायीं,
कपी ताडिती, फोडिती लात घायीं ॥ १०७ ॥
बळें मातले, हाणिती वक्षपृष्ठीं;
कपीमस्तकीं ओपिती वज्रमुष्टी; ।
फळें पीकलीं ज्यापरी होत चेंदा;
सडे सांडणी मांडणी रक्तमेंदा ॥ १०८ ॥
करीं शोभती खेटकें आणि भाले,
पुढां सांडिनी मेट पायीं निढाळें; ।
कपी काळिजें खोंचितां येर कोपे,
फळी मोडिती, पाडिती दंत थापे ॥ १०९ ॥
बळी ओढणें चंड वाहून माथां,
हरी पादपां झोडिती शस्त्रघाता; ।
उडाणें कपी पाठिशीं घेतलाहे;
पुढां पाडिती सत्वरा लातघायें ॥ ११० ॥
कटारे करीं, सूरिया एकरंगीं
उरीं, मारितां वानरा वेग अंगीं; ।
शिळा ताडिती सन्मुखी येत येतां,
उताणा पडे; सांडणी होय दांता १११
असो, देव ते वानरी देहधारी,
हरी माजले कुंजराराजभारीं; ।
शिरें फोडिती, मोडिती मान शुंडा;
मुखें फाडिती, ताडिती ग्राव तोंडा ११४
उडी घालिती, फोडिती कुंभ रागें;
पदें लोटिती, दाटिती दंत मागें; ।
महावंत मारूनियां चंडमारें,
शिरें पांचही भंगिती एकधारें ॥ ११५ ॥

पुढें ओढिती, टाकिती ऊर्ध्वपंथें;
पडे त्या उजू हाणिती आणिकांतें; ।
पताका नभीं वाजती त्या फडाडें;
तळीं लोटिती पाठिचे प्रेतपाडे ११६

अशा प्रकारचीं वर्णनें पुढें अनेक आहेत. त्यांतील १७७–१८६, १९७–२०३, २११–२२९, २६४–२७४, ३५४–४०० हीं सर्व स्थळें वीररसानें ओथंबलीं आहेत; किंबहुना, ते वीररसाचे प्रचंड लोंढे असून, त्यांच्या आवेगांत वाचकांच्या वृत्ती सांपडून वाहून गेल्याशिवाय राहत नाहींत. कित्येक ठिकाणीं रस, अर्थ, व शब्द, यांची अशी कांहीं बेमालूम सांगड घातली आहे, कीं, वाचकांच्या वृत्ती तल्लीन करण्याचें कामीं कोणाची कर्तबगारी विशेष आहे, हें सांगणें फार कठिण आहे. जीव आणि कुडी, किंवा हिरा आणि कोंदण, यांच्या संमेलनामध्यें कोण कोणाला जास्त पोषक व उपकारक होतें, हें ठरविणें जसें अशक्य आहे, तसेंच अर्थ व शब्द यांचें आहे. याचा प्रत्यय पुढील सीतेजवळील रावणाची दर्पोक्ती वाचून येईल, अशी आम्हांला खात्री आहे:—

निक्षत्री सर्व धात्री करिन निजशरीं, शत्रु मारीन शस्त्रीं,
तेव्हां तूं कर्णपात्रीं परिससि चतुरी! कीर्ति माझी चरित्रीं॥१४४॥
रौप्याद्री तुळिला, पदें प्रचाळिला, वित्तेश विध्वंसिला,
हस्तें मस्तककोटि खंडुनि फुलीं श्रीकंठ संतोषला।
शक्रा वक्र करूनि, चक्र फिरवी देवां समस्तांसि जो,
तो मी रावण धीर विक्रमगुणीं चूडामणी जाणिजों॥ १४५॥
ज्याची पादाब्जधूळी सुरगणिं सकळीं चर्चिजे भस्म भाळीं,
आज्ञेचा दंडपाळी शशि, वरुण; बळी काळ खोळे त्रिकाळीं, ।
इच्छी ते तेच काळीं, धरुनि करतळीं वोळगे चंद्रमौळी,
याचें संधान टाळी विर परम बळी दाविजे ब्रह्मगोळीं॥ १४६॥
सानें मानव राम, दानवकुळीं भासे तृणाचे परी,
त्यासीं सख्यविचार मुख्य म्हणता जीताचि प्रेतासरी।
रामाचें शिर मेरु तो हरगळां योजीन माळ जपा,
त्यापाठीं धरणीसुते! वर पती मी, निश्चयें जाण पां॥ १४७॥

हें भाषण वाचून आत्मश्लाघापर उद्दाम रावणाची हुबेहूब प्रतिमा डोळ्यापुढें उभी राहते.

मुक्तेश्वरी महाभारतांतील सरस्वतींत याहूनही अधिक जोम, आवेश, व ठसकेदारपणा, आहे. जेथें जेथें मल्लांची कुस्ती, तुंबल युद्ध, सेनेची हालचाल, रणोत्साहपूर्ण संभाषणें, वगैरे प्रसंग आले, तेथें तेथें ज्वालाग्राही पर्वताप्रमाणें वाक्प्रबंधांतही स्फोट होऊन, वाचकांच्या वृत्तीला आवेशाचे दणके, कल्पनांचे लोट, व तेजःस्फुरणाच्या ज्वाला, यांचा तत्काळ अनुभव येतो. हिडिंबासुर व भीमसेन यांच्या द्वंद्वयुद्धाचें वर्णन वाचतांना आपण दोघां प्रचंड द्विग्विजयी पेहेलवानांची अटीतटीची कुस्ती प्रत्यक्ष पाहतों आहों, असेंच भासतें:—

**तेणें दुखावला सत्राणें । भीम हाणितला चंड पाषाणें ।**
**करतळें वारून चरणें । निशाचर लोटिला ॥ ३१ ॥**
**प्राण घ्यावया संकटीं । मिठी घातली भीमकंठीं ।**
**परस्परें पडतां मिठी । मल्लयुद्ध मांडिलें ॥ ३३ ॥**
**तळप्रहार, मुष्टिप्रहार, । गुडघे-कोपर-लत्ताहार ।**
**काळकर्षण पदप्रहार । येरयेरां हाणिती ॥ ३४ ॥**
**मुष्टिघात ओपितां बळें । डोलों लागलीं पर्वतमौळें ।**
**थरथरोनी पृथ्वीतळें । महाकंप दाविजे ॥ ३५ ॥**
**करोनी किंकाट गर्जना । कंठीं रोवूं धांवे दशना ।**
**भीमें हाणोनी चडकणा । दंतपंक्ती पाडिल्या ॥ ३६ ॥**
**पांडव म्हणे, ' पापभरिता ! । शब्द न करी मदोन्मत्ता ? ।**
**श्रमोनी पहुडलीं बंधुमाता । निद्रा त्यांची भंगेल ' ॥ ३७ ॥**
**दणके वाजतां दणदणा । चेव आला पांचांजणां ।**
**दोघे भिडती आंगवणा । प्राण निकरें घ्यावया ॥ ३८ ॥**
**चौदंत झाले भद्रजाती । मृगेंद्रें कवळिला मृगपती ।**
**कीं सपक्ष पर्वत पर्वतीं । झगटे तैसे मिसळले ॥ ३९ ॥**
**शरभाचिये कवे । कीं गंडभैरव गंडभैरवें ।**
**तेवीं दोघे भिडतां हवे । धर्मार्जुनें देखिलें. ॥ ४० ॥**

**....................................**

**तंव राक्षसें वज्रमुष्टी । भीममाथां ओपिली. ॥ ५० ॥**

तें साहोनी बाहुबळीं । उचलोनी टाकिला भूतळीं ।
कूष्मांडफळ आदळे शिळीं । तंवी गात्रीं भंगला ॥ ५१ ॥
सोमयागीं पशु मारिती । तैसा धुमासिला मुष्टिघातीं ।
उभयचरण धरोनी हातीं । तीक्ष्ण भूमीं बोढिला ॥ ५२ ॥
राक्षसचरण राक्षसकंठीं । गोवोनी दुमता केला पाठीं ।
पायें चेपितां कडकडाटी । अस्थिखंडें शतचूर्ण. ॥ ५३ ॥
आर्द्रदुंदुभीचा नादू । तैसा करूनियां घोर शब्दू ।
राक्षसें प्राण त्यागितां, बंधू । धर्मादिक तोषले. ॥ ५४ ॥
राक्षसाचिया नवद्वारीं । अशुद्ध लोटलें पृथ्वीवरीं ।
सिंदुरवर्ण सरिता थोरी । भयानक वाहातसे. ॥ ५६ ॥

—आदि. ३७.

भीम व कीचक यांच्या झोंबीची तर याच्याहून वरकडी आहेः—

हस्त धरूनी हासडिला । तंव कीचक झोंबिये मिसळला ।
दोघां संग्राम माजला । अत्यद्भुत ते काळीं ॥ १४० ॥
अंतरें पाहे पांचाळी । तंव दोघे मिसळले केशकवळीं ।
मुष्टी मारितां वक्षःस्थळीं । धरातळीं थरकंपू ॥ १४१ ॥
घाय घालिती परस्परें । दणाणती दिगंतरें ।
महाप्रासादांचीं शिखरें । खचोनी पडती धडधडा. ॥ १४२ ॥
लोक म्हणती, ‘ महामारी । कोठोनी पातली इये नगरीं ? ’ ।
कोण्ही न निघती बाहेरी । भयें अंतरीं दडाले. ॥ १४३ ॥
उडोनी हृदयीं मारिली लात । वक्षःस्थळीं मुष्टिघात ।
पृष्ठीं ताडितां निघात । दणदणाट माजला ॥ १४४ ॥
कोपर, ढुमणिया, चपेट । ताडितां अस्थि होती कूट ।
कीचक म्हणे ‘ भरीन घोंट । मित्रावरुणासारिखा. ’ ॥ १४५ ॥
भीम म्हणे, ‘ नृसिंहें तवकें । असुर विदारिला नखें ।
तैसें अंग एकूनएकें । छिन्नभिन्न करूनी टाकीन ’ ॥ १४६ ॥
शत्रु नवनागसहस्रबळी । भीमें कवळितां कंठनाळीं ।
बळें ताडूनी बाहुबळीं । हस्त उखळोनी टाकिला ॥ १४७ ॥

भिडतां *नक्र आणि गजेंद्र । शरभपक्षी आणि मृगेंद्र ।
वृत्रासुर आणि देवेंद्र । मूळवैरी झुंजतां ॥ १४८ ॥
महामाया महिषासुर । शंकर आणि अंधकासुर ।
+हनुमंत आणि अखयाकुमर । अशोकवनीं ज्यापरी ॥ १४९ ॥
पूर्वी †सुग्रीव आणि वाळी । झुजिन्नले किष्किंधातळीं ।
तैसे कीचक आणि भीम बळी । युद्धकंदना मिसळले ॥ १५० ॥
भीम म्हणे; ' आंगवणें । देऊनि, शेखीं जासी प्राणें ।
जैसीं व्याधाप्रती हरणें । शिंगें पुढां झाडिती ' ॥ १५१ ॥
मागें सरोनी धांवती पुढें ॥ हृदयीं धडका मारिती गाढे ।
एकमेकां झडेपाडे । महापर्वत पैं जैसे ॥ १५२ ॥
यानंतर भीम जगजेठी । वर्मस्थळीं सहस्र मुष्टी ।
बळें ताडितां भूतटीं । मूर्च्छा दाटोनी पडियेला ॥ १५३ ॥
पुढतीं उचलोनियां शिरीं । भोवंडोनी टाकिला पृथ्वीवरी ।
सव्य पाय देवोनी उरीं । हस्त दोन्ही उपाटिले. ॥ १५४ ॥
अंगुष्ठ रोवोनी नाभिस्थानीं । छेदोनी सांडिले चरण दोनी ।
शिर पिळोनियां धरणीं । भिन्न करूनी टाकिलें ॥ १५५ ॥
जैसा किरात शस्त्रघातें । चारी पाद, ग्रीवा, हातें, ।
छेदोनियां कूर्मातें । भिन्न करी भक्षावया. ॥ १५६ ॥
तैसे निवटोनी अस्थिजाळ । शिर केलें गोळांगुळ ।
सोडिले रक्ताचे खळाळ । नदीलोटासारिखे. ॥ १५७ ॥

—विराटपर्व ३.

याप्रमाणेंच बकासुरवध ( आदि. ३८ । ७२–९१ ), भीमजरासंधनियुद्ध ( सभा. ७। १७–६५ ), जटासुरवध ( वन. १० । १७–२७ ), रावणजटायुयुद्ध ( वन. १५ । ९७–१०६ ), शाल्वाची द्वारकेवरील स्वारी ( वन. ३ ), द्रुपद-

* गजेंद्रमोक्ष या स्वतंत्र प्रकरणांत या झुंजीचें वर्णन करण्याची संधी मुक्तेश्वरांस लाभली असतां, ती त्यांनीं फुकट जाऊं दिली, याचें मोठें नवल वाटतें.

+ हें युद्ध मुक्तेश्वरांनीं रामायणांत वर्णिलें आहे. ( सुंदर० ६०–६७ ).

† या प्रसंगींचें अगदीं खणखणीत वर्णन मुक्तेश्वरी रामायणांत आढळतें. ( किष्किंधा० ४९–५४ )

शासन ( आदि. ३३ ), उत्तरगोग्रहण ( विराट. ६ ), अश्वत्थाम्याचा छापा ( सौप्तिक. २ ), शस्त्रविद्यापरीक्षा ( आदि. ३१ ) वगैरे स्थळें पाहिलीं, म्हणजे संस्कृत कवि भवभूति यानें आपल्या महावीरचरितासंबंधें जे उद्गार काढिले आहेत, कीं,

" महापुरुषसंरंभो यत्र गम्भीरभीषणः ।
प्रसन्नकर्कशा यत्र विपुलार्थाच भारती ॥
अप्राकृतेषु पात्रेषु यत्र वीरः स्थितो रसः ।
भेदैः सूक्ष्मैरभिव्यक्तैः प्रत्याधारं विभज्यते ॥ "

तेच उद्गार मुक्तेश्वरांच्या काव्यासंबंधेंही काढण्याकडे साहजिक प्रवृत्ति होते. मोरोपंतांपूर्वी होऊन गेलेल्या रामदासांशिवाय इतर सर्व नामांकित कवींपेक्षां मुक्तेश्वरांची वाणी फार जोरदार, खणणीत व आवेशी आहे. रामदासांची वाणी कोमलत्वानें जरी मुक्तेश्वरांच्या वाणीपेक्षां कमदर्जाची आहे, तरी वीररसाविर्भाव करण्यांत ती अधिक वेंचक, भेदक, तेजस्वी, व कर्कश, आहे. तिच्या तुटकपणानेंही तिच्या तडफेला विशेष जोर आलेला आहे.

## २० कोमलरचनेचे मासले.

मुक्तेश्वरांची रचना जशी प्रसंगविशेषीं कठोर व सणसणीत आहे, तशीच प्रसंगानुरूप ती कोमल, प्रेमळ, व नाजूकही, आढळते. अक्षरगणवृत्तांची बंधनें सहन करण्यापुरता जरी त्यांच्या वाणीच्या अंगीं लवचीकपणा नाहीं, तरी ती उणीव रसभावांचा विचार करितांना नजेरस येत नाहीं. रसभेदाप्रमाणें त्यांच्या शब्दसरणींत तत्काळ भेद झालेला प्रत्ययास येतो. जो वाक्प्रवाह एका ठिकाणीं नायगाऱ्याच्या प्रचंड धबधब्याप्रमाणें भूमंडळ दणाणीत, आवर्तशतानें खळबळत, गंभीर गर्जनेनें अंतराळ धुमधुमवीत, व प्रचंड आवेशानें भेडसावीत, जातो, तोच दुसऱ्या ठिकाणीं ल्हानशा झऱ्याप्रमाणें मंजुळ स्वरानें गात, लतातृणांशीं खेळत, सुमदलांना कवळीत, व पशुपक्ष्यांना आनंदवीत, झुळूझुळू वाहतांना पाहिला, म्हणजे कोणास बरें कौतुक वाटणार नाहीं ? कालभैरवाचें अकांडतांडव, व अप्सरेचा नाजूक नाच, हीं दोन्हीं एकाच व्यक्तीला साधलेलीं पाहून मन चकित झालेंच पाहिजे. मुक्तेश्वरांची भाषा जितकी एके ठिकाणीं कर्कश, तितकीच दुसरे ठिकाणीं प्रेमळ; जितकी एके ठिकाणीं खणखणीत, तितकीच दुसरे ठिकाणीं लुसलुशीत; व जितकी एके ठिकाणीं आवेशी,

तितकीच दुसरे ठिकाणीं संथ; अशी अनुभवास येते; व याच गोष्टीनें त्यांचें खरें वाक्प्रभुत्व सिद्ध होतें. मुक्तेश्वर जेवढे वीरबीभत्सभयानकांचे भोक्ते आहेत, तितकेच शृंगारकरुणवत्सलशांतांचेही आहेत. मुक्तेश्वरी काव्यांतील शृंगारकरुणवत्सल-शांतांचीं स्थळें वाचीत असतां, सर्व सात्विक भाव दाटून आल्यावांचून राहत नाहींत. स्थळोस्थळींचीं सुंदर स्त्रियांचीं, तापसाश्रमांचीं, शृंगारविलासांचीं, सृष्टींतील देखाव्यांचीं, वनोद्यानांचीं, द्रौपदीच्या धांव्यासारखीं करुणामय प्रसंगांचीं, ईशभक्तीचीं, वगैरे स्थळें नजरेखालीं घातलीं असतां, या गोष्टीची फारशी चर्चा करावयास नको. अशा प्रकारचीं अनेक स्थळें मुक्तेश्वरी काव्यांत आहेत, व तीं सर्व उतरून घेऊं म्हटलें तर निबंध अपरंपार वाढणार आहे. नमुन्याखातर दोनचार अवतरणें येथें दाखल करितोंः—

( अ ) वैश्रवणसभेचें वर्णनः—

**तपोबळें निधींच्या नाथें । जे निर्मिली निजसामर्थें ।**
**कैलासगिरीचेनि दृष्टान्तें । उपमा पावे त्रिलोकीं ॥ १०३ ॥**
**शतयोजनें भोंवती देखा । जांबूनदसुवर्णभूमिका ।**
**चिंतामणीचिया वेदिका । हीन पाषाण परिसाचे ॥ १०४ ॥**
**रत्नवृक्षांचे मांदोडे । प्रवालवल्लींचे जुंबाडे ।**
**वैडूर्यखाणी चहूंकडे । भानुतेजें झळकती ॥ १०५ ॥**
**सुधारसाचीं सुपवित्रें । रत्नसरोवरें विचित्रें ।**
**सुवर्णकमळें सहस्त्रपत्रें । दिव्यगंधें घमघमती ॥ १०६ ॥**
**गाळोनी सौदामिनीचें पाणी । चित्रें रेखिलीं सुवर्णवर्णी ।**
**रत्नमणींचीं बाळलेणीं । पालाणिलीं अरुवार ॥ १०७ ॥**
**काढोनी मुक्ताफळांचे रस । तेणें वोतिले राजहंस ।**
**नीळरत्नांचे राजहंस । नीळकंठ शुकपक्षी ॥ १०८ ॥**
**अग्र आसनें, वितानें । दिव्यगंधें ढाळिजे पवनें ।**
**शोभासमुद्रीं चंद्रवर्णें । नौका मिरवे ज्यापरी ॥ १०९ ॥**
**देव गंधर्व अप्सरागण । नृत्यवाद्यें विनोद गायन ।**
**कौतुकें तोषविती मन । तया त्रिनेत्रमित्राचें ॥ ११० ॥**

सभा. ४.

( आ ) राजसूययज्ञांत धर्मानें कृष्णाचे पाय धुतले, तेव्हांचें वर्णनः—

चरण क्षालितां धर्मातें । धाविन्नलीं त्रिलोकींचीं तीर्थें ।
तळीं वोढविती माथे । पवित्रपणालागोनी ॥ ३९ ॥
जया चरणामृताची गोडी । लागतां लक्ष्मी झाली वेडी ।
दिव्यांगनेनें आवडी । जे न सांडी सर्वथा. ॥ ४० ॥
अरुणसंध्याराग दोन्ही । मिनले बालार्कतेजकिरणीं ।
कीं पद्मरागमाणिकमणी । एकत्र पाया पातले. ॥ ४१ ॥
भूमंडळींचीं रातोत्पळें । रंग वोपितां सहपरिमळें ।
म्हणोनी चरणपद्मीं पाणितळें । संवाहानितां रंगलीं. ॥ ४२ ॥
चंद्रें शरीर कर्वतीं दिधलें । खंडूनी केलीं दहा शकलें ।
पादांगुळी जडोनी झाले । नखमणी चंद्रासारिखे. ॥ ४३ ॥
ध्वज अंकुश वज्र पद्में । ऊर्ध्वरेखा अति उत्तमें ।
सामुद्रिकें पाहतां उपमे । ठाव न दिसे द्यावया. ॥ ४४ ॥
खंडी पापांचे पर्वत । तेंची वज्र सुशोभित ।
पद्मचिन्हीं पद्मांकित । पद्मा वसे श्रियेसीं. ॥ ४५ ॥
ऐश्वर्यमदें जे मातले । विषयभोगीं सैर सुटले ।
ते अंकुशें आवरिले । स्वस्थ केले हरिपायीं. ॥ ४६ ॥
कीं चरणरूप नौका खरी । हेळा वारी भवदुस्तरीं ।
ध्वजमंडित गुणसाजिरी । जीवना वरी जगातें. ॥ ४७ ॥
साधकांतें मन संघट । लक्षोनी ऊर्ध्वरेखेची वाट ।
चहूं मूर्तींचे लंघोनी घाट । निर्गुण ब्रह्मीं मिसळती. ॥ ४८ ॥
कीं श्रीकृष्णपादांबुजीं पवित्र । प्रयागराज तीर्थ क्षेत्र ।
मिनली त्रिवेणी एकत्र । प्रत्यक्ष नयनीं दिसताहे ॥ ४९ ॥

सभा. १०.

( इ ) शर्मिष्ठेचें वर्णनः—

जैसी सुवर्णचंपककळी । कीं वोतिली मन्मथपुतळी ।
अत्यंत तारुण्यभरें लवली । परि विनत सुकुमार ॥ २९ ॥
विराजे [द्विज] राजवदनचंद्रिका । भाळीं रेखिला कस्तूरीटिका ।
आकर्णपर्यंत कज्जलरेखा । नयन तेणें शोभती. ॥ ३० ॥

दृढ बिल्वपीनस्तन । वरी मुक्तजाळी विराजमान ।
हृदयीं पदक देदीप्यमान । तेज फांके हृदयाब्जीं ॥ ९१ ॥
करिशावकशुंडादंड । तैसे सरळ भुजदंड ।
कंकणें रुणझुणती प्रचंड । मदनातें चेतवावया. ॥ ९२ ॥
हरिकटीवरी शोभे घटी । उभी राहे सन्मुख गोरटी ।
नृपातें व्यंकट दृष्टीं । लक्षीतसे वेल्हाळा. ॥ ९३ ॥

आदि. १९.

( ए ) वनश्रीचें वर्णनः—

अंतरें पाहुनिया उभा । पहात ठेला वनश्रीशोभा ।
वनसरोजीं नेत्ररोलंबा । स्वादामोदा लोभले. ॥ १०५ ॥
वनश्री वर्णावी कवणें ? । उपमे नंदनवन उणें ।
नानावृक्षीं फळें सुमनें । रससुवासें दाटलीं ॥ १०६ ॥
एक सरळ शाखाविहीन । एक ते शाखामंडित पूर्ण ।
तया ग्रीवा लतिकावेष्टन । करुनी जाती सुरवाडें. ॥ १०७ ॥
कर्पूरकर्दळी, नारिकेळी । चूतवृक्ष लवले फळीं ।
कंटकीफळांची नव्हाळी । लागली मूळीं असंख्य. ॥ १०८ ॥
द्राक्षीमंडपातळीं दाट । वाहती अमृतरसाचे पाट ।
फणसफळें त्यागुनी देंट । दाविती वाट सिंधूची ! ॥ १०९ ॥
जाई, जुई, चंपक, मालती । बकुळ, मोगरे, कांचन, शेवती ।
केतकीवनें मघमाघिती । पराग क्षिती सुगंध ॥ ११० ॥
अगरचंदन, देवदारू । हरिचंदन, मैलागरू ।
वृक्ष वेष्टितविषधरू । भूतें जैसीं निधाना. ॥ १११ ॥
न्यग्रोध, पलाश, पिप्पलतरू । जे देवत्रयाचे अवतारू ।
बिल्व, तुळसी, हरि, हरू । ज्यांचे पत्रें तोषती. ॥ ११२ ॥
अनेक वृक्षांचिया जाती- । माजी पशुपक्षी क्रीडती ।
कनककल्हारीं शोभती । पूर्णजीवनीं तडाग. ॥ ११३ ॥

—हरिश्चंद्राख्यान १.

अशा प्रकारच्या कित्येक वर्णनांचा नुसता स्थळनिर्देश करितों. शंकुतलावर्णन, आदि. १५।९७-९९; वाऱ्यानें वस्त्र उडालें असतां मेनकेची स्थिति, आदि. १५।

१३४-१४०; चैत्ररथवनवर्णन व स्त्रियांचा जलविहार, आदि. १८।२-८; पांडु व माद्री यांचा आत्मनाशावह भोगविलास, आदि. २८।१३-२५; वनभोजनवर्णन, आदि. २९।८०-९०; गंगातटींचें विश्रामस्थळ, आदि. २९।४९-५२; रंगभूमिका, आदि. ३१।६-२९; उपवर द्रौपदीचें वर्णन, आदि. ४१।२८-३२; सभावर्णनें, सभा. २; शुकरंभासंवादांतील अप्सरांचें वर्णन, वनवर्णन व रंभेनें केलेली विषयप्रशंसा; वनाचें व शिकारीचें वर्णन, आदि. १५।२९-९६; रात्रिवनवर्णन, आदि. ३६।५४-६६; वनवर्णन, सौप्तिक. १।२०-२३; अशोकवनवर्णन, रामायण सुंदर. ४५-४८; सीतादोहदपृच्छा, उत्तर. २७६-२८४; इत्यादि प्रसंगांची कोमल वाणी, व मागें निर्दिष्ट केलेल्या स्थळींची वीरभयानकादिजननी कठोर वाणी, यांची तुलना केली म्हणजे

***अमृतजलधेः पायं पायं पयांसि पयोधरः**
**किरति करकास्ताराकारा यदि स्फटिकावनौ ।**
**तदिह तुलनामानीयन्ते क्षणं कठिनाः पुनः**
**सततममृतस्यन्दोद्गारा गिरः प्रतिभावताम् ॥**

—जयदेवकृत प्रसन्नराघव.

असे मुक्तेश्वरांच्या सरस्वतीविलासासंबंधें उद्गार आपोआप निघतात. द्रौपदीचा धांवा म्हणजे एक करुणरसानें कांठोकांठ तुडुंबलेलें सरोवरच आहे! पुढें एक करुणाचा मासला दिला आहे.—

**यापरी सांडोनी दमयन्ती । नैषध गेला अरण्यपंथीं ।**
**स्वल्प उरली असतां रात्री । प्रबोधली पतिव्रता. ॥ ११० ॥**
**निकट न देखे भ्रतार । भीमकी करी हाहाकार ।**
**सबल दाटला अंधकार । भंवतें कांहीं दिसेना ॥ १११ ॥**

* तुल्य कल्पनाः–

( १ ) वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ।
लोकोत्तराणां चेतांसि को हि विज्ञातुमर्हति ॥ —भवभूति.

( २ ) कुसुमात्सुकुमारस्य क्रूरस्य क्रकचादपि ।
को जानाति परिच्छेदं स्त्रीणां चित्रस्य चेतसः ॥ —क्षेमेन्द्र.

( ३ ) कठिनींच कठिन, मृदुलीं मृदुल, तुझें हृदय बा! जसें तोय. ॥

—मोरोपंत.

घाबरेपणीं धावोनी चरणीं । अडखळोनी पडे धरणीं ।
मस्तक लागोनी पाषाणीं । रक्त वाहे भडभडां. ॥ १२२ ॥
हांक मारी दीर्घस्वरें । म्हणे, " वल्लभा धांव का त्वरें ।
मातें सांडोनी पुढारें । पाय कैसे चामकती ? ॥ १२३ ॥
तुज न देखतां, प्राण । देहीं न राहे अर्धक्षण ।
येईं सत्वर धांवोन । आलिंगन मज देईं. ॥ १२४ ॥
माझा करुनिया घात । काय तो साधिशी पुरुषार्थ ? ।
मजवेगळें तुझें चित्त । काय विश्रांति पावेल ? ॥ १२५ ॥
क्षुधित वनीं मी गोरटी । अर्धवसनें होय कष्टी ।
पडलिया वनसंकटीं । प्राण कंठीं पातला. ॥ १२६ ॥
तुज वेगळी करूं काय ? । कवणातें मी मोकलूं धाय ? ।
नाहीं बाप अथवा माय । ईश्वर तोही दिसेना. ॥ १२७ ॥
भयें झोंबूं कवणाचे कंठीं ? । सांग रिघों कवणापोटीं ? ।
तुजवेगळी सर्व सृष्टी । वोस वाटे वल्लभा ! ॥ १२८ ॥
स्नेहें धांवोनी लवलाहीं । मातें कवळ दोन्ही बाहीं ।
तुजवेगळा मज नाहीं । सोडविता, रक्षिता. ॥ १२९ ॥
तुजवरी ठेवूनियां दृष्टी । मी विसरलें दुःखकोटी ।
तुझ्या संगीं सर्व सृष्टी । सुखभरित मज वाटे. ॥ १३० ॥
धांव, धांव नैषधराया । केशीं झाडीन तुझ्या पायां ।
झाडणें करुनी झाडीन काया । तुजवरुनी आवडी. " ॥ १३१ ॥
पडे, उठे, मागुती पडे । दिशा अवलोकुनी चहूंकडे ।
'नळा ! नळा !' म्हणुनी रडे । आकांतली काननीं. ॥ १३२ ॥
'प्राणेश्वरा ! नळा ! नरेशा !' । मुखें गाजवी ह्याची घोषा ।
ऊर्ध्व अवलोकी आकाशा । रिघों पाहे पाताळीं. ॥ १३३ ॥
'नमन माझें' म्हणे अनिळा । 'माझी वार्ता जाणवीं नळा ।
लोटुनी आणीं मजजवळा । श्रेय घेईं जीवाचें. ॥ १३४ ॥
नमन करितसें, तुझिया चित्ता । उपजों नेदीं निष्ठुरता ।
चर हो ! तुम्हांतें वाहतसे माथां । परतोनी आणा नळातें. ॥ १३५ ॥

पक्षी हो! तुम्हां पक्षबळ। उडोनी शोधा माझा नळ।
वार्ता सांगोनी उतावीळ। शीघ्र आणा मजपाशीं.'॥ १३६॥
चक्रवाकांचिया युग्मा। म्हणे, 'वेदना ठाउकी तुम्हां।
नळातें शोधोनिया श्रमा। माझिया हो! परिहरा.'॥ १३७॥
मधुकरातें बोले शब्द। 'तुम्हां प्रिय पुष्पगंध।
नळाचा मुखाब्जमरंद। सेवुनी सांगा शुद्धीतें,'॥ १३८॥
दुःखसमुद्रामाजी मग्न। संकटीं गेला वर सांडुन।
परी मुखें नुच्चारी अवगुण। निंदा कांहीं न बोले॥ १३९॥
आठवुनी नळाचे कष्ट। दुःखें होतसे हृदयस्फोट।
नाठवी आपुलें संकट। वनिताश्रेष्ठ दमयन्ती.॥ १४०॥
'हा! हा! महाराज! नळ! नरेश!। मातें हो का तुझे क्लेश।
तुवां असावें सुखसंतोष। तुझें अरिष्ट मज लागो.॥ १४१॥
माझा पातिव्रताधर्म। तुतें सर्वदा करू क्षेम।
तुझे अवदशेचा श्रम। सर्व हो का मजलागीं.'॥ १४२॥
ऐशी मुखीं गाजवी ध्वनी। अश्रुधारा गळती नयनीं।
मार्गरहित वनोपवनीं। कोमल पायीं चामके.॥ १४३॥

—वन. ७

वरील करुणानें रसरसलेला उतारा वाचून, ज्याच्या हृदयाचा स्फोट होणार नाहीं, ज्याला गहिंवर दाटणार नाहीं, ज्याच्या नयनांत अश्रू उभे राहणार नाहींत, असा वज्रचेता रसिकगणांत असेल, असें आमची मनोदेवता तर्कूं शकत नाहीं. अशा प्रकारच्या हृदयदलन करणाऱ्या नाजूक प्रसंगीं मुक्तेश्वर कोणत्याही संस्कृत कविशिरोमणीला हार जाणार नाहींत. विस्तृत वर्णन करून, नानाविध रसात्मक प्रसंगांचीं हुबेहुब चित्रें रेखाटून, रसिकांचें मन व अंतश्चक्षु वश करून घेऊन, त्यांस कालदेहभानाचा विसर मुक्तेश्वर कसे पाडूं शकतात, हें वर दिलेल्या उताऱ्यावरून प्रत्ययास येईल.

सा कविता सा वनिता यस्याः श्रवणेन दर्शनेनापि।
कविहृदयं विटहृदयं सरलं तरलं च सत्वरं भवति॥

या काव्यकसोटीला मुक्तेश्वरांची कविता ठिकठिकाणीं तंतोतंत उतरल्यावांचून राह-

णार नाहीं. कोमल रचनेच्या बाबतींत ज्ञानेश्वर, तुकाराम, व एकनाथ, ह्या तीन कवीं-शिवाय इतर सर्व मराठी कवींपेक्षां मुक्तेश्वर श्रेष्ठ आहेत, असें आम्हांस वाटतें.

## २१ मुक्तेश्वरांची वाङ्मयात्मक कामगिरी.

मुक्तेश्वरांच्या रचनेची ज्ञानेश्वर, एकनाथ, व मोरोपंत, या कवींच्या रचनेशीं तुलना केली असतां, मुक्तेश्वरांची रचना सोपी व साधी आहे, असें म्हणणें भाग आहे. परंतु ती श्रीधर, महिपति, तुकाराम, शुभानंद, गोपाळ, नरहरि, नामदेव, रामदास, वगैरे कवींच्या रचनेशीं ताडून पाहिली, तर जास्ती संस्कृतशब्दप्रचुर व दीर्घसमासघटित आढळते. श्रीधराचे किंवा महीपतीचे ग्रंथ असंस्कृत किंवा पिढ्यानपिढ्या विद्येच्या संसर्गापासून दूर राहिलेले असे शूद्र व स्त्रिया यांना जेवढे सुलभ व सुबोध वाटतात, तेवढे मुक्तेश्वरांचे वाटत नाहींत. त्यांच्यामध्यें श्रीधर किंवा महिपति वाचण्याचा किंवा ऐकण्याचा जेवढा परिपाठ किंवा शोक आढळतो, तेवढा मुक्तेश्वरांसंबंधें आढळत नाहीं. रामविजय, शिवलीलामृत, पांडवप्रताप, पंढरीमाहात्म्य, अश्वमेध, भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय, वगैरे ग्रंथांवर चतुर्मासांत जशा उड्या पडतात, तशा उड्या मुक्तेश्वरी पर्वांवर पडत नाहींत, ही गोष्ट जरा आपल्या भोंवतीं नीट अवलोकन केलें असतां अनुभवास येईल; किंवा चातुर्मास्याकरितां स्वस्त झालेल्या ग्रंथांच्या वर्तमानपत्रांतून फडकणाऱ्या जाहिरातींवर नजर फिरवली, म्हणजेही वरील प्रकारची थोडीबहुत कल्पना होईल. परंतु या संस्कृताच्या विशेष साहाय्यानें मुक्तेश्वरांच्या काव्यांत जे गुण चमकूं लागले आहेत, त्यांनीं त्यांचे ग्रंथ सुसंस्कृत वाचनाभिलाषींना विशेष प्रिय झालेले आहेत. ज्यांचा संस्कृताशीं अल्पस्वल्प परिचय झालेला आहे, अशांस मुक्तेश्वरी ‘ वचनावलीच्या रचनेंत ’ रसालत्व, कोमलत्व, प्रौढी, ओज, मधुरता, भारदस्तपणा, व घोंसदारपणा, हे गुण ज्या प्रमाणांत आढळतील, त्या प्रमाणांत श्रीधरादि कवींत ते आढळणार नाहींत. अशा प्रकारच्या वाचकांस मुक्तेश्वरांत संस्कृतशब्दप्राचुर्यानें दुर्बोधत्व किंवा अर्थप्रतिपत्तिविलंब भासमान होणार नाहीं. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, व मोरोपंत, यांनीं भाषाभ्युदयाच्या व शब्दसंग्रहवृद्धीच्या कामीं महत्वाची कामगिरी केलेली आहे, यांत संशय नाहीं. संस्कृतासारख्या अभियुक्त व सर्वपरींनी पूर्ण अशा भाषेची ऐट मराठीच्या अंगीं भरण्याची कल्पना या कवींनीं सुसाध्य करून दाखविली आहे, व त्या कल्पनेचा हल्लीं महाराष्ट्र लेखक भरपूर उपयोग करून घेत आहेत.

## २२ मुक्तेश्वर व मोरोपंत.

मुक्तेश्वर व मोरोपंत हे दोघेही महाकवि होत. दोघेही सारखेच भगवद्भक्त, ईशसंकीर्तनलोलुप, व कर्मनिष्ठ, होते. दोघांचीही बुद्धि विशाल, निरीक्षण तिखट, विवेचकशक्ति सूक्ष्म, प्रतिभा उजळ, मनोवृत्ति सत्त्वस्थ परंतु जाज्वल, आणि कल्पना उदात्त. दोघांनाही संस्कृतप्राकृत वाङ्मयाचा बराच परिचय असून, दोघांनाही शब्दार्थालंकारांची, प्रौढ ऐटदार रचनेची, आणि भरघोस शब्दांची, मोठी हौस, परंतु मुक्तेश्वरांच्या स्वैर व स्वछंदी वाणीला छंदोबंधनें असह्य झालेलीं भासतात, तर मोरोपंतांची वाणी एकाद्या योगिनीप्रमाणें यमनियमांचे वेढे अधिकाधिक घट्ट करण्यांतच सुख मानिते, असें दिसतें. मुक्तेश्वरांत बऱ्याच ठिकाणीं अव्यवस्थितपणा व प्रमाणशीरपणाचा अभाव हे आढळतात, तर मोरोपंतांत बहुशः बातबेत व बांधेसूदपणा हे चमकतात. मुक्तेश्वरांचें काव्य म्हणजे शारदेचें एक भव्य गहन वन आहे, तर मोरोपंतांचें काव्य म्हणजे तिचें क्रीडोपवन आहे. एकामध्यें चंदन, वट, आम्र, निंब, इत्यादि गगनचुंबी विशाळ वृक्षांच्या मध्येंच लव्हाळ्यांचीं रानें, खाजकुइलींची जुंबाडें, कांटेरी झुडुपें, शुष्क पानांचा पसारा, व सर्पादिकांना आश्रय देणारीं जाळीं आहेत, परंतु त्यांतच वाळ्याची गर्दी, मालती, मोगरी, इत्यादिकांचे निसर्गकुंज, नव्य कुसुमांचा पेर, हींही आढळतात. अर्थात्, या गोंधळांतही एक प्रकारची भव्यता, दिव्यत्व, व चमत्कार हीं आहेत, पण त्यांबरोबरच कधीं कधीं एकप्रकारें उद्वेग व रसभंग उत्पन्न होतात, हेंही विसरतां कामा नये. आतां, दुसऱ्याकडे पहावें तों सर्वच थाट निराळा! काव्योद्यानांतील रस्ते अगदीं आंखलेले! वृक्षलतांची मांडणी अगदीं शिस्तवार! पुष्पांचा घमघमाट, ताटव्यांचा थाटमाट, पुष्करणींचे घाट, सुगंधोदकांचे पाट, पक्ष्यांचा किलकिलाट, हें सर्वच विलक्षण! आणि एवढें करूनही निसर्गसौंदर्याची छाया कायमच्या कायम! अशाप्रकारें निसर्गभिन्नास्पद गुणांचो एकत्र सांगड घालणारा कारागीर अलौकिक सामर्थ्याचा नव्हे काय? मुक्तेश्वर भलीबुरी कल्पना जशी उद्भवेल तशी ठेऊन देणार, तर तिच्या ठिकाणीं सुबकपणा आणून तिची योग्य मांडणी करावयाची हा मोरोपंती बाणा; एक व्याकरणनियमांना प्रसंगीं धाब्यावर बसविणार, तर दुसरा त्यांची योग्य संभावना करून आपला हेतु यथास्थित साधणार; एक अक्षरगणमात्रादिकांच्या कोंदणांत शब्दरत्नांना प्रसंगीं हालअपेष्टा करूनही कोंबणार, तर दुसरा कुशलपणानें विवेकाच्या चिमटयांत योग्य रत्न धरून, अनुरूप कोंदणांतच ठेवून देणार; एक प्रचंड मल्लाप्रमाणें भुजदण्ड ठोकून प्रसंगीं एकदम अंग-

बळानेंच झुंजूं पाहणार, तर दुसरा कसलेल्या पेहेलवानाप्रमाणें आपल्या अंगबळाला पाचापेंचांची जोड देणार; एक सर्व बंधनें तोडून आपल्या सामर्थ्याची प्रतीती देणार, तर दुसरा बंधनें कायम ठेवून, किंबहुना वाढवूनही, कसरतीनें आपलें सामर्थ्य दाखवून वाचकांस भुलविणार; एक केवळ उंच भरारी किंवा लांब सराळी मारणार, तर दुसरा तसें करितांना सर्व प्रकारचे गतिविभ्रम दाखविणार ! आतां, भाषेची सुबोधता किंवा दुर्बोधता ह्याचें विवेचन मागें केलेंच आहे. ज्यांना संस्कृताचें मुळींच ज्ञान नाहीं व प्राकृत ग्रंथवाचनश्रवणही फारसें नाहीं, त्यांस मुक्तेश्वरांचें काव्यही थोडेंबहुत दुर्बोधच भासतें. मोरोपंतांचा ओढा संस्कृताकडे मुक्तेश्वरांपेक्षांही जास्त असल्यामुळें, असंस्कृतज्ञांस त्यांचें काव्य बऱ्याच ठिकाणीं दुर्बोध आहे, हें अनुभवसिद्ध आहे; परंतु ज्यांस संस्कृताचा साधारण परिचय आहे, व मोरोपंताच्या कृतीचा थोडासा अनुभव आला आहे, अशा वाचकांना हें दुर्बोधपण झडून गेलेलें आढळेल. तेव्हां मोरोपंतांचें काव्य दुर्बोध आहे, हें मोघम विधान गैरसमजूत उत्पन्न करणारें आहे. केवळ प्राकृतज्ञांस संस्कृत सुबोध काव्यही जसें दुर्बोध असतें, त्यापैकींच कांहींसा वरील प्रकार आहे. असो. मोरोपंत व मुक्तेश्वर दोघेही वीररसाचे मोठे चाहाते दिसतात. परंतु मोरोपंतांपेक्षां मुक्तेश्वरांच्या काव्यांत शृंगारमय व विनोदमय कोमल वर्णनें फार विस्तृत आढळतात; अशा प्रसंगीं मोरोपंतांच्या ग्रंथांत वर्णनविस्तार फारच विरळ आहे; त्यामुळें तेथें त्यांचें काव्यवैभव एकदम डोळ्यांत भरण्यासारखें नाहीं. सृष्टिवर्णन, भोजनादिसमारंभ, दिव्य शिल्पकौशल्य दाखविणारीं सभागृहें, नीत्युपदेश, वगैरे प्रसंगीं पंतांनीं आपल्या काव्यांत अतिविस्तार न करितां, केवल दिग्दर्शन करून, वेळ मारून नेलेली आहे. परंतु कोटिक्रमप्रचुर संभाषणें, मनुष्यस्वभावाचें हुबेहुब चित्र, युद्धादि प्रसंग, करुणरसपूर्ण स्थळें, भगवद्भक्ति, राज्याभिषेकादि समारंभ, यांचें विस्तारतः विवरण केलेलें पंतांच्या काव्यांत आढळतें, व त्या कामीं मुक्तेश्वरांना ते हार जाणार नाहींत, इतकेंच नव्हे, तर ते त्यांच्यावरही जागा पटकावतील, असा आम्हांला भरंवसा आहे. शृंगारविषयांत मुक्तेश्वरांची वाणी मोरोपंतांपेक्षां अधिक सरस असून, त्यांचें कवित्वही अशा प्रसंगीं मोरोपंतांपेक्षां अधिक रंगेल झालेलें अनुभवास येतें. परंतु अशा प्रसंगींच मुक्तेश्वर कित्येक वेळां अगदींच घसरून, त्याच्या उत्तम शृंगाराचें अश्लीलपणांत पर्यवसान झालेलें आढळतें; हा प्रकार मोरोपंतांच्या सभ्य सरस्वतीच्या आचारविचारांत विरळाच सांपडेल. या मुद्दयाचा पुढें सोदाहरण विचार करण्यांत येणार आहे, म्हणून येथें अधिक ऊहापोह करीत नाहीं.

# २३ सृष्टिवर्णनें.

सृष्टींतील देखाव्यांविषयीं रसिकता मराठी कवींच्या ठिकाणीं नाहीं, असें विधान अनेक वेळां करण्यांत येतें, व त्यांत कांहींसें सत्यही आहे. इंग्लंडमध्यें कूपर, वर्डस्वर्थ्, वगैरे कवींनीं आपल्या काव्याचा भर ज्या प्रमाणांत व ज्या प्रकारें सृष्टचमत्कारांवर टाकिला आहे, तें प्रमाण व तो प्रकार महाराष्ट्रकाव्यांत आढळत नाहीं. पण त्यावरून महाराष्ट्रकवींच्या ठिकाणीं निसर्गरहस्यासंबंधें रसिकता नव्हती हें म्हणणें योग्य होणार नाहीं. महाराष्ट्रकवींचे काव्यविषय व उपरिनिर्दिष्ट आंग्ल कवींचे काव्यविषय, व त्यांच्या स्फूर्तीचे हेतु, हे अगदीं भिन्न आहेत; व त्यामुळेंच त्यांच्या पद्धतींतही भिन्नभाव दृष्टीस येतो. महाराष्ट्रकवींच्या अंगीं रसिकता व निसर्गरहस्यप्रेम हीं अखंड वसत होतीं, व तीं त्यांनीं आपल्या पुराणविषयक काव्यांतही ठिकठिकाणीं प्रतिबिंबित केलेलीं आहेत. सृष्टिस्थितीचें त्यांनीं सूक्ष्म निरीक्षण करून, व अवलोकित सृष्टचमत्कारांना नीतिस्वरूप देऊन, त्यांस आपल्या काव्यविषयाच्या प्रवाहांत अशा कुशलतेनें आणून सोडिलें आहे, कीं, त्या दोहोंचा अगदीं एकजीव होऊन गेला आहे. अशा प्रकारें उपमारूपकोत्प्रेक्षादिरूपानें सृष्टचमत्कारांचें मिश्रण काव्यांत मिळवून, त्याला अप्रतिम सौंदर्य, सुधामधुरस्वाद, मार्मिक खोंचदारपणा, व अंतर्बाह्य सृष्टीचें एकीकरण करण्याची शक्ति, हीं महाराष्ट्रकवींनीं साधून दिलीं आहेत. सूर्योदयास्तादि देखावे, ऋतुभ्रमण, गहन अरण्यें, नानाविध चमत्कारांनीं भरलेल्या वनस्पतिकोटी व जीवकोटी, गगनाचें चुंबन करणारे पर्वत व पृथ्वीचें उदर विदारणारीं दरींखोरीं, चंद्रदर्शनानें किंवा वर्षागमनानें चवताळणारा रत्नाकर, पक्ष्यांचें गाणें, व श्वापदांच्या गर्जना, इत्यादि गोष्टींनीं जशा पाश्चात्य कविजनांच्या वृत्ति उचंबळतात, मन सृष्टिलीन होऊन जातें, उदात्त विचारांनीं अंतःकरण दाटून येतें, आत्मबोधाचा प्रत्यवभास होतो, तद्वत् महाराष्ट्रकवींचीही अवस्था होते व तशीच प्रत्येक कालांतील व देशांतील कवींची होत आली आहे. मुक्तेश्वरांच्या काव्यांतून पुष्कळ उदाहरणें या विधानांच्या समर्थनार्थ देतां येतील. आतांपर्यंत जे उतारे घेतले आहेत, त्यांत अशा धारणांचीं पद्यें आलींच आहेत, तरी आतां येथें पांचसहाच नमूद करितों.—

( अ ) याचकाची दुरवस्थाः—

**जैसीं आदित्याचीं झाडें । सन्मुख डोलती सूर्याकडे ।**
**कीं पत्रें पसरलीं एरंडें । आवरूं नेणे सर्वथा; ॥ १८ ॥**

तैसा दातयासन्मुख । सदा पसारिला हस्तक ।
नाना अवज्ञेचें दुःख । तो विभाग तयाचा. ॥ १८ ॥
—आदि. १८.

(आ) चित्तासारिखें मिळे दुसरें । तेथें सौख्याचा सागर भरे ।
त्यासी तुळावयासी सरे । यत्नही होय माघारा. ॥ १२० ॥
*योग्या योग्य मिळे अवचट । त्यालागीं बोलिजे भाग्य श्रेष्ठ ।
अयोग्य संगतीचे कष्ट । खेद देती क्षणक्षणा ॥ १२१ ॥
भ्रमर शोधितां पुष्पजाती । अकस्मात मिळे मालती ।
तेथं येरयेरां उपेक्षिती । हें कैसेंनि घडेल ? ॥ १२२ ॥
—आदि. १८.

( इ ) स्वागत पुसे कल्याण राम । द्रोण म्हणे, ' मी द्रव्यकाम ।
स्वामीचे चरण कल्पद्रुम । ठाकोनी आलों श्रांतलों. ॥ ६३ ॥
दानसूर्याचेनि प्रकाशें । तीन्ही लोक उजळिले दिशे ।
दरिद्रउलूक पळतां न दिसे । ठाव कोठें लपावया ॥ ६४ ॥
दिशांधेर निबिड पाहीं । संतोषदीप न लभे कांहीं ।
म्हणोनि दाटलें माझे गेहीं । सांगों आलों स्वामिया ! ॥ ६५ ॥
आदि. ३०.

( उ ) कृष्ण, भीम व अर्जुन यांस जरासंध म्हणतोः—

मुखाकृती मशकाऐसी । पर्वत गिळीन, म्हणे माशी ।
तुमची बोली टिटवीतैसी । आश्चर्य करी आमुतें ॥१५९ ॥
ऊर्णनाभी स्वतंत्रसूत्रीं । पृथ्वी झांकीन म्हणे वस्त्रीं ।
वृश्चिक नांगियाचे शस्त्रीं । खंडीन म्हणे वज्रातें ॥ १६० ॥
खद्योत मिरवी रविमंडळा । मुंगी उचली ब्रह्मांडगोळा ।
तेवीं तुझें बोलणें वरळा । शक्तीहूनी अचाट ॥ १६१ ॥
अवलोकोनी आपणाकडे । शक्तीसारिखें बोलिजे तोंडें ।
याचकें जीविकेचिये चाडे । मागों ये, तेंचि मागावें. ॥ १६२॥
—सभा. ६.

---

* अथसादृश्यः—सतां सद्भिः संगः कथमपि हि पुण्येन भवति । —भवभूति.

( ऋ ) इंद्रगोपवर्णी वास । चांदवा दावी सुप्रकाश ।
झळकती मुक्ताफळांचे घोस । कृत्तिकापुंजासारिखे ॥ १७५॥
—सभा. १५.

( ऌ ) सुदेष्णेच्या जवळ सैरंध्रीला पाहून कीचकानें केलेल्या कृतींचें वर्णन:—
अयोग्य स्थळीं कल्पलतिका । वृंदारकीनिकट कर्दाळका ।
देखोनी म्हैसा मारी थडका । माजोनिया ज्यापरी; ॥ ४ ॥
अमृतवल्ली फळली फळीं । वनांत वाढली निराळी ।
पांथिक क्षुधेचिया काळीं । काष्टिका ताडिती निर्धारें; ॥ ५ ॥
तेवीं सुंदर सगुण वनिता । आप्ता वेगळी परगृहीं वसतां ।
कामिकमेळ भोंवे भोंवता । हें आश्चर्य तंव नव्हे. ॥ ६ ॥
—विराट. ३.

( ए ) *सुशर्मा वाहोनिया चाप । बाण सोडी अति अमूप ।
सहदेव खंडी जैसे सर्प । गरुडमुखें तडतडां. ॥ ११० ॥
सुशर्म्याचें शरसंधान । जेवीं वांकुडी घाली घन ।
पांडवबाण प्रळयपवन । उडवोनी सांडी क्षणार्धे. ॥ १११ ॥
कोटि पापांचे विशाळ द्रुम । कुठार विष्णुसहस्त्रनाम ॥
तैसा तो पांडवोत्तम । शत्रुशस्त्रें विखंडी ॥ ११२ ॥
दरिद्रकाळींच्या कोटी आपदा । नासूनी सांडी धनसंपदा ।
तेवीं शत्रूची शरबाधा । माद्रीसुतें खंडिली. ॥ ११३ ॥
निशाकाळींचीं उडुगणें । नाशिती येतां सूर्यकिरणें ।
तेवीं पांडूचिया नंदनें । शत्रुबाणातें खंडिलें. ॥ ११४ ॥
अप्रीतिकाळींचे कुशब्दू । नाशिती स्नेहाचे सुशब्दू ।
सुशर्म्याचीं शस्त्रें विविधू । नकुळानुजें छेदिलीं. ॥ ११५ ॥
स्मशानभूतांचिया कोटी । रात्रीं भासुर भासतां दृष्टी ।
नृसिंहमंत्र जपतां ओठीं । जेवीं पळती दशादिशा; ॥ ११६ ॥
नानाविध भूताकृती । नाहींच करिती ब्रह्मसंयुती ।
तेवीं शत्रुशरांचिया पंक्ती । शून्य केल्या सहदेवें. ॥ ११७ ॥
—विराट. ५

* या उताऱ्यांत घोळून घोळून वर्णन करण्याची मुक्तेश्वरी हातोटी पूर्ण निदर्शनास येते.

शुद्ध निर्मळ सृष्टिचमत्कारांचीं वर्णनेंही मुक्तेश्वरांच्या काव्यांत आढळतात व तीं फारच रसभरित व प्रसादपूर्ण आहेत. आदिपर्वाच्या छात्तिसाव्या अध्यायांतील

**भीमसेन पाहे दृष्टी । तंव अंधारें कोंदली सृष्टी ।**
**गुल्मलता, वृक्षदाटी । तृणें, मार्ग लक्षेना. ॥ ५४ ॥**

इत्यादि रात्रींचें वर्णन व

**शेष वेंचितां अठरा घटिका । पूर्व दिशेनें क्षाळिलें मुखा ।**
**कुंकुम रेखिलें त्या तिलका । अरुणोदय बोलिजे. ॥ ६८ ॥**

इत्यादि अरुणोदयाचें वर्णन, हीं दोन्ही लोकविश्रुत आहेत व अनेक रसिकांनीं आपापल्या निबंधांत उद्धृत केलीं आहेत. यांशिवाय पुढील सूर्यास्त व वर्षाकाल यांचीं वणनेंही सहृदय वाचकांस मोहून टाकतील असें वाटतें:—

**( अ ) वरुणदिग्वधूचें वदन । चुंबिता झाला सहस्रकिरण ।**
**हें देखोनी अति उद्विग्न ।*म्लानमुख पद्मिणी. ॥ १८६ ॥**
**' भ्रष्ट पुरुषांची जाती ' । ऐसा विकल्प धरूनी चित्तीं ।**
**चक्रवाकी आपुला पती । त्यजूनी जाती परपारा ॥ १८७ ॥**
**पवित्र स्पर्शला देखोनी दोषा । कलंकी उजळी आपली दशा ।**
**क्षुद्र पावती संतोषा । तेवीं तारा झळकती ॥ १८८ ॥**
**गृहस्थ पडतां अनाचारीं । झाला आश्रित दिवाचारी ।**
**गाढ निद्रेच्या अंधारीं । लपावया चालिले ॥ १८९ ॥**
**समर्थ पावती तेजहाणी । दूतिका गर्जती निंदावचनीं ।**
***पंकोद्भव *नीचयोनी । म्हणोनी कुमुदें *हांसती. ॥ १९० ॥**

—आदि. ३१

**( आ ) यावरी पातला वर्षाकाळ । पंचम ऋतु झाला प्रबळ ।**
**सुटला पश्चिमेचा अनिळ । मेघमाला मोकली. ॥ १९१ ॥**
**पृथ्वीमंडळींचा जळराशी । *पारधी पातला आकाशीं ।**
**पिटीत *मृगांचे पाठिशीं । सैरा गगनीं धावत. ॥ १९३ ॥**
***इंद्रचाप धरूनी मुष्टी । *रोहिणीमृगांचिया पाठीं ।**
**मेघधाराजीवनवृष्टी । करीत वेगें पातला. ॥ १९४ ॥**

* या ठिकाणचाही श्लेष उघड आहे.

†कलंकी=( १ ) चंद्र, ( २ ) पापाचारी. हें एक श्लेषाचें ठळक मुक्तेश्वरी उदाहरण आहे.

* या ठिकाणचाही श्लेष उघड आहे.

सूर्यकिरणमृगसमुदाय । निस्तेज होउनी पावले भय ।
लपावया शोधीत ठाय । अभ्रें आड करूनिया. ॥ १९५ ॥
कीं पृथ्वीखंड त्या शाळुंका । अनेक पर्वत शिवपिंडिका ।
इंद्रें मांडिलें अभिषेका । गगनपात्रीं बहुधारा. ॥ १९६ ॥
मयूर, चातक, कपोतक, । दर्दुर करिती महाघोख ।
' मेघ जगाचा पाळक ' । सर्वलोकां जाणविती. ॥ १९७ ॥
विद्युल्लतांचे कडकडाट । घनगर्जना गडगडाट ।
गंगादि सरितांचे संघाट । महापूर माजले. ॥ १९८ ॥
अठरा भार वनस्पती- । अंकुरवसनें वेढिली जगती ।
फळशाकाधान्यसंपत्ती । पृथ्वी पिके जगातें. ॥ १९९ ॥
विष्णु जगाचा प्रतिपाळिता । तोची मेघ होय तत्त्वता ।
प्रमाण करुनी चंद्रसविता । आप वोपी अयनांशें. ॥ २०० ॥

वरील वर्णनें म्हणजे दिव्य प्रतिभा, प्रसन्न वृत्ति, चपळ कल्पना, निसर्गप्रेम, व ईशभक्ति, या शुद्ध बीजांपोटीं जन्मलेलीं गोमटीं रसाळ फळेंच आहेत, हें सांगण्याची जरूरी नाहीं.

## २४ धार्मिक व नैतिक शिकवण.

मुक्तेश्वरांचें निसर्गनिरीक्षणांप्रमाणें व्यवहारनिरीक्षणही फार सूक्ष्म होतें. डॉ. जॉनसन यांनीं जी कवितेची व्याख्या+ केली आहे, ती मुक्तेश्वर, मोरोपंत, इत्यादि कवींच्या काव्यांला बव्हंशांनीं लागू पडते. मनोरंजन हा जरी या कवींच्या काव्यांचा तात्कालिक हेतु असला, तरी अंतिम हेतु लोकशिक्षण हाच दिसतो. ' ईश्वरभक्ति हाच आपला काव्यरचनेचा हेतु आहे, भक्तीशीं विसंगत अशीं वर्णनें असतील तर तीं सज्जनांनीं खुशाल खोडून टाकावीं, ' असें मुक्तेश्वरांनीं वाचकांना एके ठिकाणीं बजाविलें आहे.—

जेणें वाढे उत्कट भक्ती । तो तो विशेष लिहिला ग्रंथीं ।
नावडे तें स्वहस्तीं । खोडोनी दूर करावें. ॥ १६५ ॥ —सभा १.

परंतु त्यांच्या काव्यांचें योग्य परिशीलन केलें असतां, केवळ ईशभक्ति किंवा ईशकथासंकीर्तन हाच त्यांचा हेतु नव्हता, हें समजून येईल. प्रत्यक्ष

+ The end of writing is to instruct; the end of poetry is to instruct by pleasing,—Preface to Shakespeare.

ईशभक्तीशीं ज्यांचा संबंध लागत नाहीं, असे शृंगारवीररसांचे प्रसंग, भोजनसमारंभ, राजनीति, समाजनियम, अचारविचार, सामान्य नीतितत्वें, यांवर मुक्तेश्वरांनीं जो पाल्हाळ केला आहे, त्याचा विचार केला, तर तो निर्भेळ उत्कट भक्तीचाच उद्रेक आहे, असें म्हणवत नाहीं. मुक्तेश्वर जरी साधुसंतमालिकेंत मोडत नाहींत, तरी त्यांच्या ग्रथांकडे नीट लक्ष्य दिलें असतां असें दिसून येतें, कीं, त्यांचा आत्मा राष्ट्रहित करितां तळमळत होता. स्वधर्मीयांना सुस्थिति यावी, आपल्या समाजांतील व्यंगें दूर होऊन तो उन्नत व्हावा दुष्टांचें दंडन व साधूंचें पालन करणारी राजनीति असावी, आपल्या राष्ट्रबांधवांनीं मर्दानी पेशा कायम ठेवून दिग्विजयाचा झेंडा नाचवावा, अज्ञानाचा निरास होऊन बहुजनसमूहाला जागृति यावी, व त्यास आपल्या निकृष्ट अवस्थेचा उलगडा पडावा, ‘ टिळा टोपी ’ करणाऱ्या दांभिक भोंदूंच्या कसबांतून आपला समाज सुटावा, सदाचाररनीतीचा विजय व्हावा, अधर्माचें देव्हारें कमी व्हावें, इत्यादि महाविभूतींच्या अंतःकरणांत निरंतर चळवळणारे विचार मुक्तेश्वरांच्या अंतःकरणांतही खळबळत होते. त्यांनीं आपल्या काव्यांत, मनोरंजनाचें धोरण कायम राखून, प्रसंगानुरूप कधीं दृष्टांन्तामिषानें, तर कधीं रूपकादि स्वरूपानें, कधीं मुग्ध दिग्दर्शनानें, तर कधीं प्रत्यक्ष व्यक्तरूपानें, व्यावहारिक गोष्टींची सुंदर गुंफणी करून टाकिली आहे. सामाजिक चर्चेचा ज्या बाणेदारपणानें त्यांनीं ऊहापोह केला आहे, व कित्येक स्थळीं तीसंबंधें त्यांनीं जो विस्तार केला आहे, त्यांकडे कटाक्ष ठेवला ह्मणजे मुक्तेश्वर समाजसुधारणेला किती महत्व देत होते, व समाजव्यंगावर बोट ठेवण्यांत ते किती कुशाग्र व निःस्पृह होते, हें ध्यानीं येण्यासारखें आहे. या दिशेनें मुक्तेश्वरांची कामगिरी तुकाराम, रामदास, वामनपंडित, इत्यादि कवींच्या धोरणाचीच आहे, मात्र ती तेवढ्या विशाल प्रमाणावर नाहीं, व तिचा प्रत्यक्ष परिणाम काय घडला, हेंही आजमावतां येण्यासारखें नाहीं. ही कामगिरी व तिचें फळ हीं ठळक रीतीनें नजरेस न भरण्याचें कारण मुख्यतः हेंच, कीं, मनोरंजनाच्या पडद्याआड या कामगिरीचें तेज आहे. चिमणीच्या प्रखर तेजानें डोळे दिपूं नयेत ह्मणून त्यावर कागद घालणें, किंवा मुलांना जंताची पूड साखरेच्या पाण्यांत देणें, अशांतलाच वरील प्रकार आहे, ह्मणजे, मनोरंजन हाच मुक्तेश्वरी काव्यांचा तात्कालिक परिणाम आहे, तरी लोकशिक्षण—समाजसुधारणा, ज्ञानप्रसार, सदाचाराचा विजय, दंभस्फोट, इत्यादि-हाच त्याचा अंतिम हेतु आहे. मुक्तेश्वरांनीं लोकस्थितिसंबंधें जे उद्गार व सामाजिक

आणि राजकीय गोष्टींविषयीं जे तात्विक व मार्मिक विचार, आपल्या काव्यांत व्यक्त किंवा मुग्ध रीतीनें गोंविले आहेत, त्यांवरून तत्कालीन राष्ट्रस्थितीचा चांगलाच अंदाज करितां येतो.

मुक्तेश्वरांच्या काळीं ब्राह्मणांमध्यें शास्त्राध्ययन बरेंच जारीनें चालत असे, व ठिकठिकाणीं निरनिराळ्या मतवाल्या पंडितांचे कडाक्याचे वाद होत असत. अर्थात्, या वादांमध्यें तत्त्वांपेक्षां शब्दांवर जोराच्या चकमकी उडत असल्यामुळें, ते वाद ह्मणजे कुशाग्र बुद्धीच्या कसरतीचे खेळच होते. त्यांत ज्ञानापेक्षां अभिमानाला व ऋजुत्वापेक्षां आग्रहालाच जास्त महत्व आलेलें असे. त्यामुळें व्यवहारी, कर्मनिष्ठ, व छळवादपराङ्मुख, अशा समंजस व्यक्तींना या वादांचा प्रत्यक्ष कोणताच उपयोग होत नसे, व ह्मणून ते सर्वांसच सारखा मान देत असत. ज्याप्रमाणें हल्लीं क्रिकेट, आट्यापाट्या, बुद्धिबळें, वगैरे खेळांचे सामने होतात, त्यांतलाच वरील वादांचा थोडाबहुत प्रकार असे. त्यांत वाद मिटविण्याचा फारसा प्रयत्न नसून वाद करण्याच्या चातुर्याचीच परीक्षा पाहण्याचा हेतु असे. अशा प्रकारचा वाद मुक्तेश्वरांनीं शकुंतलाख्यानांत कण्वाच्या तपोवर्णनांत आणिला आहे, व त्यास व्यासकृतींत त्या ठिकाणीं मुळींच आधार नाहीं. तेव्हां पंडित मंडळीचा मुक्तेश्वरांस जो नित्याचा अनुभव असे, त्याचाच पगडा येथें तपोवर्णनप्रसंगीं कवीच्या मनावर बसून, तो अनुभव कवीनें शब्दांत वठविला आहे. या वादांत कवीनें जाणतेपणाचा हक्क जरी वेदांत्यांस दिला आहे' असें भासतें; तरी

**ऐसे नानामतांचे वाद । रायें परिसोनी महाविनोद ।**
**सांडोनिया भेदाभेद । एकभावें समस्तां ॥ ९३ ॥**
**साष्टांग करूनी नमन । राहवुनी सेनाप्रधान ।**
**निसंग एकाकी आपण । कश्यपाश्रमीं प्रवेशे ॥ ९४ ॥**

—आदि. १५.

असें वाद ऐकणाऱ्या राजाचें वर्णन करून, ' असे वाद ह्मणजे केवळ महाविनोदाचीं स्थळें होत, त्यांतील भेदाभेद दूर न होण्याजोगा अतएव ऐकून विसरण्याजोगाच होय, हे मतवाले सर्वच नमनायोग्य होत, ' असें आपलें मत मुक्तेश्वरांनीं स्पष्ट दर्शविलें आहे.

मुक्तेश्वरांच्या वेळीं निरनिराळ्या संप्रदायाचे साधुसंत मोठमोठे शिष्यपरिवार बाळगून हिंडत असत, असें दिसतें. हल्लींप्रमाणें त्यावेळींही या संताळ्यांतून

व गोसाव्यांच्या मेळ्यांतून पोटभरू दांभिकांचा व दुराचारी सोंगड्यांचा मोठा सुळसुळाट असे. अशा अधर्मांवर मुक्तेश्वरांचा साहजिक मोठा कटाक्ष होता व त्यावर त्यांनीं कठोर फटकारे ओढले आहेत. याचे एकदोन मासले देतों:—

( अ ) पद.

भूतदयादिक हरिगुरुभजनीं नित्य प्रेमा नसता ।
चंबु, उटीनें मुद्रा लावुनि, वेष दाविती वरता ॥ १ ॥
चतुर्थ आश्रम संपादुनिया दंडकमंडलु त्यजिती ।
देह आकृती गेली नसतां परमहंस म्हणविती ॥ २ ॥
कानांमध्यें बोट घालुनी, दडपुनि डोळे धरिती ।
हिरवे पिंवळे रंग पाहुनी स्वरूप मुद्रा म्हणती ॥ ३ ॥
टाळ मृदंगी सुस्वर गायन पोटासाठीं करिती ।
हरिचे भजनीं प्रेमा नसतां हरिचे दास म्हणविती ॥ ४ ॥
मुक्तेश्वर कवि शिकवी सुजनां भजनाविणही न तरे ।
या कलियूगीं व्यासें कथिलें, सांगतसें तुज हित रे ॥ ५ ॥

( आ ) पद.

सांग पां वैराग्य कोठें रे । सर्व विडंबिलें पोटें रे ॥ ध्रु० ॥
बाइल सांडुनि शिष्यिण मेळविलि । घर सांडुनि मठमाया रे ॥१॥
सोदर त्यागुनि शिष्यचि भोंवते जीविकेसि घातला पाया रे ॥ २ ॥
उदीम सांडुनि भिक्षेसि हिंडणें । देशांतरीं दंड कां या रे ॥ ३ ॥
सावण सांडुनि गेरुसि नाशिलें । संन्यास घेतला काचा रे ॥ ४ ॥
मिष्टान्नभिक्षेलागुनि धांवती । जिव्हा वेधलि लांचा रे ॥ ५ ॥
करूं नये तें झांकुनि करिती । ‘ सर्व ब्रह्म ’ म्हणती वाचा रे ॥ ६ ॥
लीलाविश्वंभर नेणवे जंववरी । मोक्ष तों पावेल कैंचा रे ? ॥ ७ ॥

हा प्रकार मुक्तेश्वरांच्या वेळीं फार माजला होता, असें अनुमान त्यांनीं ठिकठिकाणीं केलेल्या उल्लेखावरून करितां येतें. ‘ मूर्खांच्या लक्षणांत ’ ते म्हणतात:—

गृह त्यागूनी, मठाची माया । शिष्यिणी करूनी, त्यागी जाया ।
सुहृद त्यजोनी, धरी शिष्यसमुदाया । तो एक मूर्ख ॥ ६२ ॥
परोपदेशीं कुशलभारी । आपण अधर्म अकर्म करी ।
त्याच्या वचनाचा विश्वास धरी । तो एक मूर्ख जाणावा ॥६३॥

**तोंडें म्हणे ' सर्वही ब्रह्म ' । आचरे वेदविरुद्ध कर्म ।**
**त्याचा शिष्य होय तो परम अधम । महामूर्ख या नांव ॥ ६४ ॥**
**विजया ( =भांग ) भक्षुनी लावी ध्यान । ममता आंगीं आणि कथी ज्ञान ।**
**बोले एक, करी आन । तो एक मूर्ख जाणावा ॥ ९६ ॥**

तसेंच रामायणांतील सुंदरकांडांत राक्षसी राहाटीचें वर्णन करितांना, त्यांनीं वरील दुष्ट व्यवहारावरच कटाक्ष ठेविला आहेसें दिसतें:—

**गुणातीत हो चिद्घनानंद आत्मा । कदा नातळे इंद्रिया देहधर्मा ॥**
**मना आवडे ते सुखें भोग भोगी । म्हणे मुक्त मी ज्ञानिया राजयोगी ६**
**सुरा प्राशिजे, भक्षिजे आवडे तें । परस्त्री बळें भोगिजे सांपडे ते ॥**
**विधीवाद तो सर्व मायीक मानी । जिवन्मुक्त तो बोलती ब्रह्मज्ञानी ७**

धर्माच्या नांवावर पैसे उकळणारे, भक्तीच्या नांवावर दंभ विकणारे, मंत्रोपदेशाच्या नांवावर अनाचार करणारे, निःसंगित्वाच्या नांवावर देशास भूर्दंड पाडणारे, बोके संन्यासी, सिद्धसाधक, व ढोंगी गोसावी, समाजास रसातळास नेतील, असेंच मुक्तेश्वरांस वाटत होतें. खऱ्या सुस्थित व सुशील समाजांत यांना जागा मिळूंच नये, असें ते म्हणतात. दुष्यंतराजाच्या अंमलांत उत्तमोत्तम समाजास्थिति होती अशी कल्पना करून, जें वर्णन मुक्तेश्वरांनीं केलें आहे, त्यांत समाजाला भिकारी करणाऱ्या व त्यावर आपल्या पापकृत्यांनीं दुष्काळादि संकटें आणणाऱ्या या भोंदूंना मुक्तेश्वरांनीं पायही ठेवूं दिला नाहीं:—

**धर्मरीति धर्मधन । सेवूनी संतुष्ट सर्व जन ।**
**स्वस्वकर्मी सकळ वर्ण । विहिताचारी वर्तती. ॥ २२ ॥**
**दर्शनें गृहस्था भयकारी । नाहींच झाले भिकारी ।**
**ब्राह्मण निरंतर सदाचारी । अत्यंत दंभें सांडिले ॥ २४ ॥**
**विषयविष्ठेंत बुडालीं मनें । शरीरें वैरागर चंदनें ।**
**चर्चूनी, मिरविती शब्दज्ञानें । ते गोसावी तैं नव्हती. ॥२५॥**
**स्वकाळीं पर्जन्य वोपी उदका । रत्नधान्यें समृद्धी पिका ।**
**पृथ्वी पिके हो, मांत्रिका । फळे जैसी श्रीविद्या. ॥ २६ ॥**

तसेंच नारदनीतीमध्यें धर्मराजाला पुढील प्रश्न करण्यांत आले आहेत:—

आचार दाऊनी लोकदृष्टी। अंतरीं अनाचार राहटी।
ऐसे दांभिक तुझ्या निकटीं। वर्तणारे नसती कीं? ॥ १४० ॥
तोंडें बोलोनिया ब्रह्म। भंगिती सदाचारधर्म।
प्रशंसिती अविचार कर्म। ते संसर्गीं त्यजिले कीं? ॥१४१॥
दाऊनी योगियाचें चिन्ह। पोषिती उदर आणि शिश्न।
त्यांच्या ठायीं तुझें मन। विश्रामत नाहीं कीं? ॥ १४२ ॥

ज्या अर्थी मुक्तेश्वरांनीं या प्रकारचा असा अनेक ठिकाणीं पुनरुच्चार केला आहे, त्या अर्थी त्यांच्या वेळीं हा वर्ग समाजाला फार घातक होऊं पाहात होता, असें अनुमान काढल्यास चूक होईल, असें वाटत नाहीं. गृहस्थवर्गांतही अनाचार थोडा-बहुत पसरला असल्याचें मुक्तेश्वरांनीं सुचविलें आहे. चोरून मारून *मद्यपान, †दासीसंग, ‡घरांत शूद्री घालणें, वगैरे नीतीच्या मूळावर कुऱ्हाड चालविणारे प्रकार चालू असल्याबद्दल मुक्तेश्वरांचे उल्लेख आढळतात. मुक्तेश्वरांचीं 'मूर्खांचीं लक्षणें' म्हणजे त्या वेळच्या समाजांतील दुष्ट व्यवहारांचीं टिप्पणेंच आहेत. त्यांतील कित्येक वाचलीं म्हणजे मुक्तेश्वर व्यवहारांत किती चाणाक्ष, सूक्ष्मदृष्टी, व तल्लख होते, हें स्पष्ट होतें:—

सभेमाजी खेळवी बाळ। स्त्रियेशीं कटकट करी सर्वकाळ।
आळसनिद्राकुसंगीं सारा वेळ। क्रमी तो एक मूर्ख. ॥ ८२ ॥
साली अथवा मेहुणी। रूपवंत कुशल तरुणी।
स्त्रियेच्या बाळंतपणा आणी। तो एक मूर्ख जाणावा. ॥८३॥
खाटीक, तस्कर, मत्स्यविक्रेता। यांसी द्रव्य व्यवहारिता।
परांगनेशीं मैत्री कर्ता। तो एक मूर्ख जाणावा ॥ ८५ ॥
गृहदासीसी घाली हात। पलांडू सेवी श्रोत्रियांत।
अविंधी राहाटी श्रेष्ठांत। तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८६ ॥
बाळविधवा, वरी घरीं राहात। नपुंसकाहातें पढवी सुत।
शूद्राहातीं अभ्यास करवीत। तो एक मूर्ख जाणावा ॥ ८७ ॥
उत्तर वयीं करी लग्न। जीविकेविण बांधे सदन।
प्राणत्यागीं न वेंची धन। तो एक मूर्ख जाणावा ॥ ८९ ॥

*आदि. १७।१२९-१३१. मूर्खांचीं लक्षणें ३२, ६८ व आदि २६ १३-१४ सभा. १२।८१.

या ओंव्या वाचल्या म्हणजे त्या काळच्या सामाजिक चालीरीतींवर बराच प्रकाश पडण्यासारखा आहे.

गरिबांचें लग्न करून देणें, हे कृत्य मुक्तेश्वरांच्या काळीं फार पुण्यकृत्य समजत असत, इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष राज्यकर्त्यांनेंही त्या कामीं दक्षता ठेविली पाहिजे, अशी स्वतः मुक्तेश्वरांची कल्पना होतीः—

**तरुणवरातें कन्यादान । क्षुधिता मिष्टान्नभोजन ।**
**दरिद्रियातें ओपिजे धन । परधर्म या नांव. ॥११९॥**-आदि. २९.
**दरिद्रब्राह्मणाची जाया । तारुण्यकाळीं अंतरे, राया ! ।**
**ऐकोनी त्याचिया विवाहकार्या । साह्य संपूर्ण करिसी कीं ? ५९**
—सभा. ३.

विवाहकाळीं श्रीमंतांकडे किती टोलेजंग भोजनसमारंभ होत असत याची कल्पना, अभिमन्यूचा विवाह, राजसूययज्ञ, कौरवपांडवांचें वनभोजन, इत्यादि प्रसंग वाचले म्हणजे थोडीबहुत होण्यासारखी आहे. अभिमन्यूच्या विवाहप्रसंगींच्या भोजनसमारंभाचें वर्णन म्हणजे मुक्तेश्वरांना माहित असलेल्या शाकभाजा, चटणीकोशिंबिरी, गोडधोड पक्वान्नें, यांची एक लांबलचक यादीच आहे. लग्नसमारंभांत बायकांचे मानपान, त्यांचें रुसणेंफुगणें, गोंधळ घालणें, धेंडा नाचविणें, वगैरे प्रचार व कुलाचार हल्लींप्रमाणेंच मुक्तेश्वरांच्या वेळीं होतेः—

**वाण पालटणें, रुसणें प्रीती । मंडपा आणून पुजणें पुढती ।**
**वंशपात्रदान विध्युक्ती । कन्या हातीं निरविणें ॥ १०० ॥**
**धेंडा नाचवितां कौतुकें । हांसानी श्रीकृष्ण बोले मुखें ।**
**'कुरुक्षेत्रीं रणभूमिके । *धेंडा पुढें नाचवूं ' ॥ १०३ ॥**
—विरा. ८.

आईबापांस सोडून सासुरवाडच्या माणसांच्या नादानें चालणारे कुश्चित्ताचारी व सासूंना छळणाऱ्या सुना, यांचाही मुक्तेश्वरांस चांगला अनुभव आलेला दिसतो. त्यांनीं नारदनीतींत शेवटीं शेवटीं पुढील प्रश्न राजास घातले आहेतः—

**मातापिता दवडूनी दूरीं । श्वशुरवर्ग सांठवी घरीं ।**
**ऐशा कुश्चित्ताचारपरी । तुझ्या देशीं नाहीं कीं ? ॥ १४४ ॥**

* हेंही एक श्लेषाचेंच उदाहरण आहे.

**सुना छळिती सासुवांतें। पुत्र अव्हेरिती पित्यांतें।**
**सेवक अवगणिती स्वामीतें। ऐसें होत नाहीं कीं ?॥ १४५॥**
—सभा. ३.

आतांपर्यंतच्या प्रतिपादनावरून धार्मिक व सामाजिक बाबतींत महाराष्ट्र किती स्थिरप्रकृति आहे, याचा ताळा पडतो. सद्यःकालीं महाराष्ट्रांत धार्मिक व सामाजिक क्रान्ति घडवून आणण्याला किती प्रबळ कारणें आहेत व किती निकराचे प्रयत्न चालले आहेत, तें लक्षांत घेतलें म्हणजे वरील स्थिरप्रवृत्तीचें विशेषच आश्चर्य वाटतें. मुक्तेश्वरांचे उद्गार आजच्या समाजालाही तंतोतंत लागू पडतात व ही समाजाची स्थिति त्यांच्या पूर्वी किती शतकेंपर्यंत होती, हें सांगणें बहुतेक अशक्यच आहे. शेंकडों वर्षांच्या मुसलमानांच्या करड्या अंमलाखालीं चुरडलेल्या हिंदु समाजानें आपलें स्वत्व सोडिलें नाहीं, ही त्याच्या चिकाटीची उत्तम साक्ष आहे. इंग्रजी अमलासारख्या शिक्षण, कलाकौशल्य, वाङ्मय, धर्म, समाजघटना, व्यवसाय, इत्यादि सर्व दिशांनीं जितराष्ट्रांस विदेशी वळण लावणाऱ्या अमलाखालींही, पांच पन्नास वर्षांतच हिंदु राष्ट्र शुद्धीवर येऊन, आपलें स्वत्वाचें डबोलें उराशीं अधिक अधिक घट्ट कवळूं पाहात आहे, हेंही वरील प्रवृत्तीचें स्पष्ट लक्षण आहे. असो.

## २५ विदेशी व्यापारी.

मुक्तेश्वरांच्या वेळीं हिंदुस्थानांत परदेशचे पुष्कळ व्यापारी येत असत. त्या वेळीं हिंदुस्थान फार सधन असल्यामुळें, देशांत संपत्तिसंपादक अनेक धंदे ऊर्जित दशेंत असल्यामुळें, व हिंदुस्थानांत पैदा न होणाऱ्या चिजा या परकीय व्यापाऱ्यांच्या मार्फत लाभत असल्यामुळें, एकंदरींत या व्यापाराच्या उलाढालीनें हिंदुस्थानाचें कल्याण होत असे; त्याच्या कारागिरीच्या जिनसांना गिराईक मिळे, त्याचा कलाकौशल्याचा लौकिक पसरे, त्याच्या धनाढ्यतेनें परकीयांना वचक बसे, व एकंदर व्यापारावर या गोष्टींचा अनुकूल संस्कार घडून येई. अशा परकी व्यापाऱ्यांना सवलती याव्या, त्यांच्याबरोबर विशेष आदरानें देवघेव करावी, त्यांना संतुष्ट ठेवावें, असें मुक्तेश्वरांचें मत होतें. अर्थात्, सांप्रत हिंदुस्थानावर आलेल्या औद्योगिक संकटाचें स्वप्न त्या वेळीं मुक्तेश्वरांना पडणें संभवनीय नसल्यामुळें, अनियंत्रित व्यापाराला ते अनुकूल होते, तें योग्यच दिसतें:—

**परद्वीपींच्या अमोल वस्ता। वणिक आणिती इच्छूनी अर्था।**
**त्यांच्या पुरवोनी मनोरथा। लाभ चौगुणी देसी कीं ?॥१३४॥**

**देशावरा पातले अर्थी । द्रव्य देऊन त्यांचे आर्ती ।**
**जगीं जोडावी सत्कीर्ती । हे तुज इच्छा असे कीं ? ॥ १३५ ॥**
—सभा. ३.

वस्त्राखालीं हात झांकून मालाच्या किंमती बोटांनीं सुचविण्याच्या गुमास्त्यांच्या व अडत्यांच्या चालीचाही मुक्तेश्वरांनीं एके ठिकाणीं उल्लेख केला आहे:—

**वस्त्रें झांकोनिया हातू । मोलें नेमुनी देती वस्तू ।**
**तेवीं अंतःपट शोभितू । नांदीयुक्त जवळिके, ॥४९॥**—विराट. ८.

त्या वेळीं कापडाचा व्यापार फार चलतीचा असून, हिंदुस्थानांत हरतऱ्हेचें तलम कापड तयार होत असे. द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं मुक्तेश्वरांनीं अनेक प्रकारच्या चुनड्या, लुगडीं, साबुलीं, पातळें, कुलड्या, साड्या, शेले, शेलारे, यांचा निर्देश केला आहे. त्या वेळीं उत्तम प्रकारचीं चिटें तयार होत असून, त्यांवर विष्णुशंकरांचीं सहस्रनामें, मत्स्यादि अवतारांचीं चित्रें, भूगोलाचे नकाशे, व शंकरपार्वत्यादिकांच्या प्रतिमा, हीं रेखलेलीं असत. हीं वस्त्रें द्रौपदीस देणाऱ्या कृष्णवणिकाची धांदलही मोठ्या विनोदानें कवीनें वर्णिली आहे:—

**बाप वेव्हारा चक्रपाणी । आणिल्या पेटारिया भरोनी ।**
**स्नेहें बुझाविली बहिणी । विटंबिलें वैरियां ॥ २३५ ॥**
**गौरवूनी पांडववनिता । काळिमा आणिला वैरियां माथां ।**
**अंगुष्ठ तोंही न दिसे रिता । तेथें मुख केउतें ? ॥ २३६ ॥**
**ग्राहक देखोनी प्रचंड । सोडिलें ब्रह्मांडींचें दिंड ।**
**वस्त्रें वोपितां उदंड । लेखा शेषा न करवे. ॥ २३७ ॥**
**वैकुंठराज्यपेठींचा चाटा । मोकली वस्त्रांचिया मोटा ।**
**द्रौपदी दुःशासनभाटा । वोंवाळणी देतसे. ॥ २३८ ॥**—सभा. १५

## २६ राजधर्माचें विवेचन.

धर्मनीतिपर राजाच्या आमदानींत देशांत दुष्काळ, दारिद्र्य, रोगराई, येत नाहीं असा मुक्तेश्वरांचा अभिप्राय आहे. पावसाची वाण पडली, तरी शेतकीला धोका येऊं नये म्हणून तळीं, विहिरी, खोदणें, व पाटबंधाऱ्याचीं कामें करणें, हें राजाचें अवश्यकर्तव्य आहे, असें ते समजत, व शेतकीच्या उत्तेजनार्थ गरीब शेतकऱ्यांना तगाई व बीयाणें

द्यावें, असेंही ते म्हणतात. यावरून मुक्तेश्वरांचें व्यवहारांत किती दक्षत्व होतें, हें उघड होत आहे:—

**रोग, दारिद्र्य, कीं बंधन । दुःख, दुर्भिक्ष, अकाळमरण, ।**
**सर्प, वृश्चिक, तस्कर, जाण । दुष्यंतराज्यीं असेना. ॥ २३ ॥**

—आदि. १५.

**नापेक्षितां मेघजळें । सर्वदां पिकें पिकती सकळें ।**
**अभंग, तडागें, पाटस्थळें । पैं निर्मिलीं असती कीं ? ॥ १०७ ॥**
**कृषीवलें खंगलीं भणंगें । धनधान्य वोपूनी अंगें ।**
**शेताचेनी राजभागें । पाळिसी कीं नरेंद्रा ? ॥ १०८ ॥**
**लुब्ध, तस्कर, लेखनकारी । राजस्त्रिया, राजकुमरी ।**
**प्रजालागीं बलात्कारीं । पीडा करीत नसतीं कीं ? ॥ १०९ ॥**
**उदरपीडेचिया महामारीं । उत्तमेंही करितां चोरी ।**
**धरूनिया आणितां राजहेरीं । मानें मुक्त करिसी कीं ? ॥ १११ ॥**

—सभा. ३.

राजानें जितेंद्रिय असावें, गोब्राह्मणाचें पालन करावें. कामगारांना योग्य पगार देऊन, लांचलुचपतीला जागाच ठेवूं नये. गुणांवर भार ठेवून कामदार नेमावे, तेथें वशिल्याला किंवा वर्णभेदाला शिरूं देऊं नये. अचाट कामें सेवकांकडून करवून घ्यावीं व त्यांना त्याचा मोबदलाही अचाट द्रव्यानें व मानदानानें करावा. आपले मंत्री योग्यप्रकारें कारभार करीत आहेत कीं नाहींत, हें समजण्यासाठीं गुप्त हेर ठेवावे. भिल्ल, ठक, कोळी, इत्यादि शांतताभंग करणाऱ्यांच्या राहाट्या मोडून टाकाव्या. परराष्ट्र जिंकण्याच्या कामीं रणभूमीवर धाडसी सैन्य उभें करावें, व युद्धार्थ समोर येणाऱ्या शत्रूचें पीठ करावें, परंतु त्यावेगळ्या शांततेनें राहणाऱ्या प्रजेची उगीच नागवण करूं नये. मुंगी चावतांक्षणीं त्या ठिकाणीं जसा हात आपोआप वळतो, त्याप्रमाणें दुःखार्त दीनांना शोधून, राजानें त्यांच्या साहाय्यार्थ धांवावें. दुर्गांवर—किल्ल्यांवर—राज्याचें सामर्थ्य अवलंबून असल्यामुळें, ते मुळींच नादुरुस्त होऊं देतां कामा नयेत. त्यांत अन्नसामग्री वगैरे वेळच्या वेळीं पुरवीत गेलेंच पाहिजे:—

**वर्ष पालटूनिया जीर्ण । दुर्गपर्वतीं नूतन धान्य ।**
**यंत्र, औषधी, अक्षयी जीवन, । संग्रहीत असती कीं ? ॥७७॥**

**पडले खचले जेथें जेथें । तात्काळ सरिसे करिती तेथें ।**
**ऐसे शिल्पिकार भृत्ये । वेतन भोक्ते असती कीं ? ॥ ७८ ॥**

—सभा. ३.

मठ, विहिरी, देउळें, यांचा जीर्णोद्धार करणें, गुणी जनांना मुक्तद्वार ठेवणें, राजपुत्रांना योग्य शिक्षण देणें, सैन्याचा पगार वेळच्या वेळीं चुकता करणें, खजिन्याची उधळपट्टी न करणें, सडका, रस्ते, यांची योग्य दुरुस्ती ठेवणें, यांकडे राजानें सूक्ष्म लक्ष पुरविलें पाहिजे. प्रजेचा संतोष हेंच राजाचें भूषणः—

**उग्रकामी स्त्रीधनहर्ता । कुळवंताही त्यागिती भर्ता, ।**
**तैसें तूतें धरित्रीनाथा । प्रजांहीं त्यागिलें नाहीं कीं ? ॥ ८६ ॥**
**याचक त्यागिती पतितातें । कुळें वाळिती जातिभ्रष्टातें ।**
**तेवीं सर्व लोकीं तूतें । उपेक्षिलें नाहीं कीं ? ॥ ८७ ॥**

—सभा. ३.

देशांत स्वास्थ्य नांदावें, व सर्व व्यवहार सुरळीतपणें चालावे, ह्मणून देशरक्षणाची व रानांत राहाळ्या करून राहणाऱ्या लुटारू लोकांचा बंदोबस्त करण्याची व्यवस्था राजानें केली पाहिजेः—

**नगर रक्षावयाकारणें । किजेत ग्रामाचीं पट्टणें ।**
**घोष घोष ग्रामतुल्य करणें । ऐसें करीत असती कीं ? ॥ १०५ ॥**
**पर्वतसंधी घांट बेटा । वोस रानें पाहोनी चोखटा ।**
**तेथें वसवूनियां पेटा । मार्ग निर्भय करिसी कीं ॥ १०६ ॥**

—सभा ३,

‘ अग्नि, सर्प, चोर, व्याघ्र, रोग, राक्षस, व परचक्र, ’ यांपासून राज्याचें मोठ्या मर्दपणानें संरक्षण करावें, व शत्रुनाशास्तव जरूर पडल्यास अकबरी व अवरंगझेबी उपायही अंमलांत आणावे, असें मुक्तेश्वरांनीं सुचविलें आहे.

**शत्रुनाशालागीं आघवे । विषप्रयोग जाणसी बरवे ।**
**वासपुष्पफळांसवें । प्राण घेसी परांचे कीं ? ॥ १३८ ॥**

—सभा. ३.

‘ वैद्यगोवा, चंपी करणारे, न्हावी, कोष्टी, नापिक, व जवळचे हुजरे, ’ यांविषयीं राजानें फारच सावध राहिलें पाहिजे, कारण अनेक वेळां त्यांच्याच द्वारें फंदफितूरी व दंगे होत असतात.

## २७ मर्दानी खेळ.

मुक्तेश्वरांच्या वेळीं मर्दानी खेळांची, तालमीची, कुस्त्यांची, दांडपट्याची महाराष्ट्रांत फार चलती होती असें दिसतें. मुक्तेश्वरांना या गोष्टीची किती हौस होती, हें, त्यांचीं द्वंद्वयुद्धांचीं वर्णनें व कौरवपांडवांची धनुर्वेदपरीक्षा, हीं प्रकरणें वाचलीं म्हणजे स्पष्ट होतें. असो. एकंदरींत या ऊहापोहावरून असें सिद्ध होतें कीं, मुक्तेश्वरांचा काव्यग्रंथांतील हेतु केवळ भक्तीचा गौरव नसून, लोकांत व्यवहारज्ञान यावें, राजनीतीचीं तत्त्वें त्यांस कळावीं, समाजांतील दोष दूर व्हावे, लोकांचा आळस झडून त्यांनीं मर्दानीपणा दाखवावा, राष्ट्रांत तेज चमकूं लागावें, इत्यादि गोष्टींचा त्यांनीं आपल्या काव्यहेतूंत अंतर्भाव केलेला आहे.

## २८ वर्णनविस्ताराची आवड.

मोरोपंतांपेक्षां मुक्तेश्वर विस्तारप्रिय अधिक आहेत. एकदा वर्णनाच्या भरांत ते आले, म्हणजे विचार व शब्द यांचा प्रवाह इतक्या जोरानें अस्खलित सुरू होई, कीं, त्यांचें त्यांनाच भान न राहून, कित्येक वेळां त्यांच्या इच्छेविरुद्धही विस्तार होत असे. दुष्यंताचा दिग्विजय वर्णावयाचा प्रसंग येतांक्षणीं मुक्तेश्वरांची कल्पनाशक्ती अगदीं बेबंद झाली, व तिला आवरतां आवरतां त्यांना पुरेवाट झाली आहे. पांचपन्नास देशांचीं व म्लेंच्छांचीं नांवें देऊन, हें दिग्विजयप्रकरण पुन्हां सभापर्वांत येणार असल्यामुळें आपल्या उत्सुकतेला गवसणी घालून, मुक्तेश्वरांनीं ही देशराष्ट्रांची नामावळी मोठ्या कष्टानें अर्धवट सोडिली आहे:—

**देशविदेश वदावे येथ । ते सहज सभापर्वाआंत ।**
**बोलणें असे समयोचित । राजसूयप्रसंगीं ॥ १७ ॥**
**याचिलागीं या अवसरा । विशाळ वक्तृत्वाचा वाग्दोरा ।**
**सांवरोनी जव माघारा । उन्मेष केला तुरंग. ॥ १८ ॥**

आदि. १५.

येथें हें लक्ष्यांत घेण्यासारखें आहे, कीं, दुष्यन्तदिग्विजयप्रसंगांचा पाल्हाळ खुद्द मुक्तेश्वरांनाच जरासा अस्वाभाविक व अप्रासंगिक आहेसा वाटला. एके ठिकाणीं कवी श्रोत्यांस विनवितो कीं:—

**सांडूनी व्यासाची संगती । चालों नये आणिकें पंथीं ।**
**ऐसें जाणोनिया श्रोतीं । व्यर्थ विस्तार न मानावा. ॥ २५२ ॥**

सभा. १२.

एकंदरींत आपल्याला प्रत्यक्ष अनुभवानें, वाचनानें, व कर्णोपकर्णीं, जें ज्ञान पैदा झालेलें आहे, त्याचे आपल्या वाचकांस भागीदार करण्यासाठीं मुद्दाम ओढून ताणून प्रसंग आणून, व कालविपर्यासाचा दोषही पतकरून, मुक्तेश्वरांनीं पाल्हाळ केलेले आहेत. सभापर्वांत धर्मसभेमध्यें आलेल्या ऋषींची व राजांची यादी वाचण्याची वेळ आली, तेव्हां मुक्तेश्वर म्हणतातः—

**मूळभारतीं कवींचा नाथ । ऋषी राजे असंख्यात ।**
**बोलिला तें बोलतां येथ । अतिविस्तार होऊं पाहे ॥ ९३ ॥**
**क्षुद्रसरिता प्राकृतमती । सविस्तार निरोपणजीमूती ।**
**राया वांकडी लागतां निश्चितीं । समुद्रप्राय माजेल. ॥ ९४ ॥**
**निरोपण सुपथीं आडथळा । पायगोंवा वाटे सकळा ।**
**यालागीं न पडोनी पाल्हाळा । संकळित अनुवादे. ॥ ९५ ॥**

सभा. २.

पण इतकी संक्षेपाची प्रतिज्ञा करूनही मुनिनृपांचीं मिळून जवळजवळ शंभर नांवें कवीनें दाखल केलीं आहेत ! कौरवपांडवांचें वनभोजन ( आदि. २९।८१–९१ ) निरनिराळे युद्धप्रकार व आयुधें (आदि. ३०।१५८–१६४ व आदि. ३१।३४–६० ), पक्वान्नांची यादी ( विराट. ८।६०–८८ ), इत्यादि ठिकाणीं कवीनें जो पाल्हाळ केला आहे, त्यांत कवित्वापेक्षां माहितीचेंच महत्व जास्त आहे. कित्येक प्रसंगींचा त्यांचा वर्णनविकास फारच हृदयंगम आढळतो, व कवित्वास त्यांत केवळ ऊतच आला आहे, असा भास होतो, व वर्णनीय वस्तू वाचकांच्या डोळ्यापुढें मूर्तिमंत उभीच राहते. विस्तृतपणामुळें अशा ठिकाणीं मुक्तेश्वरांचें काव्य अत्यंत उत्तान व मोहक वाटतें, व संक्षेपामुळें मोरोपंतांचें काव्य अत्यंत ध्वनिमय व मार्मिक भासतें. अशा प्रकारचें एकच मुक्तेश्वरी स्थळ सादर करितों.

शुक्रशापानें ययातीला प्राप्त झालेली जराः—

**ऐसें बोलतां तेच क्षणीं । काया वलीपलितें व्यापिली. ॥७४॥**
**दशनीं वोस पाडिलें वदन । अंधत्व पावले विशाल नयन ।**
**बधिरत्वा पातले सुश्रवण । हस्तचरण न चलती. ॥ ७५ ॥**

**शरीरीं उठला शीघ्र कंपू । कमठरूप अवगली वपू ।**
**चावळतांही वाग्जल्पू । अर्थहीन उमजेना. ॥ ७६ ॥**
**मस्तक श्मश्रू सुनीळ वाळ । बकाच्या ऐसे आतले धवळ ।**
**घ्राणीं श्लेष्मा, मुखीं लाळ । स्रवों लागली झुळझुळां. ॥७७॥**
**†चढतां निर्बळतेचा †गुण । धनुष्याकृती आपलें ठाण ।**
**नम्र विनीत मराणाभेण । प्राणदान खोकत. ॥ ७८ ॥**
**विकार रोगाचे दारुण । लागती कुश्चळतेचे बाण ।**
**त्रास मानूनी स्वकीय जन । धाकें पळती परौते. ॥ ७९ ॥**

आदि. १९

या उताऱ्यांत ध्वनि मुळींच नाहीं, वाच्यार्थापलीकडे कल्पनेची उडीच नको आहे. परंतु हें वर्णन इतकें हुबेहूब आहे, कीं, वाचतांना एकादा जख्खड म्हातारा आपल्यापुढें उभाच आहे, असा भास होतो !

## २९ संभाषणचातुर्य.

जरी मुक्तेश्वरांच्या काव्यांतील संभाषणें मोरोपंताच्या काव्यांतील संभाषणाएवढीं सफाईदार, बाणेदार, आटोपसर, व प्रौढ, वाटत नाहींत; तरीपण त्यांत व्यवहारज्ञान, मार्मिकता, व कोटिक्रम, हीं कमी आहेत असें नाहीं. ज्या ठिकाणीं मूळ संस्कृत भारतांत केवळ नेभळीं कोटिक्रमहीन संभाषणें आहेत, त्या ठिकाणींही मुक्तेश्वरांनीं आपल्या प्रतिभेनें व प्रसन्न कल्पकतेनें संभाषणाचे अत्यंत हृदयंगम मासले उठवून दिले आहेत. त्यांतील व्यवहारचातुर्य, बहुश्रुतपणा, दाखले, व डावपेंच, पाहून अंतःकरण आश्चर्यस्तब्ध होतें. सरळपणा, स्वाभाविकपणा, व रसाळपणा, यांनीं हीं संभाषणें जादूप्रमाणें मनास भुलवितात. मुद्देसूदपणानें व विचारक्रमानें तीं तत्काळ मनांत ठसतात. कचानें दैत्यगुरूकडे संजीवनीविद्याप्राप्तीस्तव जावें म्हणून इंद्रानें त्याचें मन वळवतांना केलेलें भाषण वरील प्रतिपादनाचें सत्य सिद्ध करीलः—

**( इन्द्र ) म्हणे, ' आमुचें पद न हाले । तुझें पुरोहितत्व चाले ।**
**ऐसें तुवां पाहिजे केलें । जें मी सांगेन त्या रीती. ॥ ३० ॥**

---

† येथील श्लेष उघड आहे.

यत्न न करितां मिळे सृष्टीं। तें वसु असे शत्रूचे गांठीं।
नीचसेवक होइजे निकटीं। हितस्वार्थाकारणें. ॥ ३१ ॥
लोकलाज आणि अभिमान। सांडोनी आपुलें थोरपण।
कार्य साधिती विचक्षण। गृहा जावोनी शत्रूच्या. ॥ ३२ ॥
यालागीं तुवां विवेकमूर्ती। जाऊनी शुक्राचार्याप्रती।
शिष्य होऊनी विनयभक्ती। पुत्रविश्वास दाविणें. ॥ ३३ ॥
अवंचकपणें करुनी सेवा। हृदयमांदुसामाजील ठेवा।
संजीवनीमंत्र साधावा। निधी जैसा पायाळें. ॥ ३४ ॥
भक्तीनें तोषे अंतःकरणीं। तैसी करावी महाकरणी।
साधूनी विद्या संजीविनी। वंद्य होई विबुधांतें. ॥ ३५ ॥
देवयानी शुक्रतनया। प्राणापरीस पढियंती पितया।
तिचें चित्त उपासलिया। साध्य होईल निज अर्थ. ॥ ३६ ॥
शील, दाक्षिण्य, माधुर्य वचनीं। आचारवंतें अवक्र गुणीं।
आराधितां देवयानी। संजीविनीफळ लाभे. ॥ ३७ ॥
मी श्रेष्ठ, श्रेष्ठाचा कुमर। धरी विद्येविण अहंकार।
सुज्ञ सुविद्या न करी नर। तो शतमूर्ख जाणावा. ॥ ३८ ॥
सर्वाभिमान लोटोनी चरणें। धूर्तता लाहोनी अंतःकरणें।
शिष्यत्व न घेतां कां तेणें। अमोघ विद्या कथिजेल. ॥ ३९ ॥
म्हणोनी आतां न लावीं उशीरू। जाऊनी उपासीं असुरगुरू।
नाना क्लेशें धरूनी धीरू। कार्य साधीं सुजाणा ! ॥ ४० ॥
साखरेतें स्वादिष्ट करणें। कर्पूरातें सुवास देणें।
चतुरपुरुषातें शिकविणें। हेची नेणीव सांगातिया ! ॥ ४१ ॥

—आदि. १७.

ययातीनें यदुप्रभृति आपल्या चार मुलांजवळ जरेच्या बदला त्यांचें तारुण्य मागितलें असतांः—

शर्मिष्ठेचा कनिष्ठ कुमर । वेगळा करूनी पूरु प्रवीर ।
चौघे म्हणती, ' हा विचार । अटक; आम्हां ठाकेना. ॥ ९२ ॥
दुःखदोषांचें आगर । वार्धक्य तेंचि नरक घोर ।
त्याचा करूनि अंगीकार । तारुण्य आम्हां न देववे. ॥ ९३ ॥
विशेषें मातृभोगकामा । तारुण्य मागसी पुत्रां आम्हां ।
देतां मात्रागमनकर्मा । पात्र आम्ही निर्धारें. ' ॥९४॥–आदि. १९.

या भाषणांतील कोटी व पेंच मूळ संस्कृतांत आढळत नाहींत. या मुद्द्यासंबंधें दाशपति व भीष्म यांचें भाषण ( आदि. २३।५३–५९ ), दुर्योधनास बाळपणींच टाकून देण्यासंबंधें विदुर व धृतराष्ट्र यांचें संभाषण ( आदि. २६।८५–९८ ), उद्दालकाच्या मुलानें केलेली ब्रह्मदेवाची निंदा ( आदि. २७।१३०–१३६ ), विद्यापरीक्षेच्या वेळीं कर्णार्जुनाचें रंगभुमीवरील संभाषण ( आदि. ३१।११८–१३२ ), शुकरंभासंवाद, वगैरे स्थळें प्रेक्षणीय आहेत. कित्येक स्थळीं संभाषणांत साधेपणाबरोबर ग्राम्यपणालाही मुक्तेश्वरांनीं वाव दिलेला आढळतो, व एकंदर भाषण उमदें असून मध्येंच ग्राम्यत्वानें त्याला किंचित् किळसवाणें रूप येतें.

दाशकन्येबरोबर विवाह करण्यास उत्सुक झालेला शंतनु, आपल्या विवाहविचाराचा उपन्यास आपला मुलगा जो भीष्म त्याजवळ असा करितोः––

वंशीं संतती दिसे स्वल्प । हा मज हृदयीं चिंतासर्प ।
लागला, म्हणोनी संताप । अहोरात्र शमेना. ॥ २९ ॥
तुजसारिखा प्रतापवंत । पुत्र न मिळे त्रैलोक्यांत ।
परंतु देह अंतवंत । काय केव्हां कळेना. ॥ ३० ॥
एकदृष्टीचा डोळस । एकचरण चालता पुरुष ।
एकहस्ताचा हव्यास । करितां व्यंग जनदृष्टीं ॥ ३१ ॥
एकपुत्रें पुत्रवंत । तो नेणता झाला बहुत ।
क्षणक्षणा लागला मृत्य । आयुष्य नाशी जगाचें ॥ ३२ ॥
प्रवासप्रसूतिकलहाचारें । ऋतुस्पर्शरोगसंचारें ।
एकभार्येच्या भ्रतारें । दुःख जैसें भोगिजे ॥ ३३ ॥

**एक निष्क असल्या ग्रंथीं । काय तो मिरवे कुबेरपंक्तीं ।**
**म्हणोनी तुजलागीं सांगाती । बंधुवर्ग असावे. ॥ ३४ ॥**

—आदि. २३.

ह एकंदर भाषण ठसकेदार व गोड उतरलें आहे; परंतु यांत तेहतिसाव्या पद्यांतील कल्पना शंतनूच्या तोंडीं घालतांना सभ्याचार व वक्त्याश्रोत्याचा संबंध यांचा विसर मुक्तेश्वरांस पडला होता कीं काय, अशी शंका येते.

## ३० नीतिवचनें.

इतर मराठी कवींप्रमाणें मुक्तेश्वरांनींही आपलीं काव्यें नीतिवचनरत्नांचीं बहुमोल भांडारेंच करून ठेविलीं आहेत. हीं वचनें एकत्र केलीं असतां धमार्थकाम या त्रयीच साधन करून देणारा एक ग्रंथच तयार होईल. हीं नीतिवचनें फार चातुर्यानें काव्यविषयांत गोंवून दिल्यामुळें व तीं प्रत्येकाच्या थोड्याबहुत प्रमाणानें अनुभवाला येत असल्यामुळें अत्यंत हृदयंगम झालेलीं आहेत. सुस्वर गायनानें मृग जितका वेधून जातो, त्याहूनही अधिक वेध हीं सुंदर वचनें रसिकमनाला लावितात, व लांबलांब निर्बंधांनींही जें कार्य होऊं शकत नाहीं, तें कार्य, हीं वेंचक व आटोपसर मार्मिक वचनें, वाचकांच्या मनांवर घडवून आणितात. अशा तऱ्हेच्या कांहीं स्थळांचें येथें नुसतें दिग्दर्शन करितोंः—

कुळवंतेचीं दूषणें ( आदि. १६।९२–१०४ ), वोखटा शब्द व स्नेहत्रुटी ( आदि. १८।४८–५२ ), दारिद्य व याचना ( आदि. १८।१९; ३०।१२५ ), निर्बळ नवऱ्याची उन्मत्त स्त्री ( आदि. ९।४८–५७ ), पुरुषार्थहीनाची विडंबना ( सभा. ५।५६–६२ ), सुपुत्र व कुपुत्र ( सभा. ५।६९–८९ ), दैव व प्रयत्न ( सौप्तिक १।५५–६१ ), सत्य ( आदि. १६।२०६–२१४ ), दोषदृष्टि ( आदि १६।१८९–१९९ ), वगैरे.

हीं सर्व स्थळें इतकीं उत्तम आहेत, कीं, तीं सर्व उतरून घेण्याचा आम्हांला क्षणोक्षणीं मोह पडत आहे, परंतु विस्तार फार होणार, म्हणून त्या भानगडींत न पडतां, मन आवरणें प्राप्त आहे. तरीपण, वरील स्थळें वाचकांनीं मुद्दाम पहावीं, अशी त्यांस आम्ही आग्रहानें गळ घालतों.

## ३१ अभिमान व विनय.

मुक्तेश्वरांना आपल्या काव्यांची किंमत पूर्णपणें कळत होती. रसिक, सहृदय, श्रोत्यांना आपले काव्य पसंत पडणार, अशी त्यांच्या मनांत अभिमानपूर्वक खात्री वागत होती; व अरसिक, अजाण, श्रोत्यांना आपल्या काव्यांत गोडी लागली नाहीं, तर त्याची ते फारशी परवा करीत नसत. यामुळें मुक्तेश्वरी काव्यांत, विद्वान् सुज्ञ श्रोत्यासंबंधें विनय, व अप्रबुद्ध दूषकांसंबंधें ताठा, हे दोन्हीं दृष्टोत्पत्तीस येतात. श्रोते कसे असावेत, याचें त्यांनीं एके ठिकाणीं विवेचन केलें आहेः—

स्थिरासनी, चिंतारहित । सात्विक, अर्थज्ञ, प्रेमभरित ।
कथाश्रवणीं नित्य व्रतस्थ । वरी उदार सर्वस्वें, ॥ ११ ॥
जितेंद्रिय, सदाचारी, । क्षमाशील, परोपकारी ।
परगुणपरीक्षासुविचारी । दयावंत सर्वदा, ॥ १२ ॥
इहीं लक्षणीं जे पुरते । 'श्रोते' ऐसें बोलती त्यांतें ।
ग्रंथींचा अर्थ काढूनी हातें । हृदयीं लेवूं जाणती. ॥ १३ ॥
त्यांहीं लिहिलें शासनपत्र । जेवीं पाषाणीं कोरिलें चित्र ।
कीं विंधिलें घटिकायंत्र । मिळों नेणे कल्पान्तीं ॥ १४ ॥
वाचोनी अभिषेकपात्रा पाडें । गळोनी होय कोरडें ।
पद्मपत्रीं पडे न पडे । तैसा ढळे घनबिंदू. ॥ १५ ॥
रोंवोनी उपडितां दाभणा । छिद्र शोधितां न दिसे कोणा ।
हृदयशून्य तैसे जाणा । अनधिकारी अश्रोते. ॥ १६ ॥
तुंबीफळ बुडविलें जळीं । राहे जंव धरिलें करतळीं ।
रांधिलें चित्त घे उसाळी । कथा संपतां अवलोकीं. ॥ १७ ॥
स्वातितोयबिंदुकणिके । शुक्तीं मुक्ताफळचीं पिकें ।
कीं उदकीं सिंतोडा न देखे । तैल जैसें विस्तारे. ॥ १८ ॥
तैसा श्रवणीं पडतां शब्द । अर्थगर्भ वाढे विशद ।
प्रतिपळीं प्रसवे बोध । सिंधु जैसा लक्ष्मीतें. ॥ १९ ॥

ऐसिया समर्थ श्रोतिया। मान केला बैसावया।
अश्रोते अनधिकारियां। ठाव तेथें न मिळेची. ॥ २० ॥
—आदि. १३.

अशा समर्थ श्रोत्यांचा कृपाकटाक्ष लाभावा, व त्यांनीं आपलें हीन काव्यही गोड करून घ्यावें, म्हणून मुक्तेश्वरांनीं अनेकवार विनवणी केली आहेः—

भक्तीनें मुक्तेश्वराचीं वचनें। ऐकतां तोषती सज्जनमनें।
जैसें काचमणीचें लेणें। लंकेसी लेती श्रीमंत. ॥ २४६ ॥
—आदि. १६.

तें परिसावें कविपंडितीं। न्यून तें पूर्ण करावें श्रोतीं।
जैसें दुर्बळाचे प्रहस्तीं। समर्थ वेंची हातींचें. ॥ १५३ ॥
—आदि. १७.

इति श्रीमहाभारते आदिपर्वणी। अगाध व्यासमुखींची वाणी।
अमृतभरित मंदाकिनी! लोकत्रया तारक. ॥ १७७ ॥
तेथें मुक्तेश्वराची वाणी। क्षुद्रनदी मिळाली मिळणीं।
पवित्रता सुस्वादगुणीं। समान संतीं मानिजे. ॥ १७८ ॥
—आदि. २२.

मुक्तेश्वर विनवी संतां। कृपाहस्त ठेवोनी माथां।
शिकवाल तरी बोलूं कथा। शुकसारिकेसारिखी. ॥ १९९ ॥
—आदि. ३१.

प्रार्थनेची परडी भरी। आनंदाचा 'उदो' करी।
अवदानाचा मी भिकारी। जोगवा मागें संतांतें. ॥ २४८ ॥
मूळपीठ तें तुमचे पाय। आदिस्थान तुमचें हृदय।
तुमची कृपा रेणुका माय। प्रसन्न हो का आमुतें ॥ २४९ ॥
निर्मळ मायेचा गवाळा। दावा दिवियांचा उजाळा।
नाचती भक्तीच्या जिव्हाळा। ऐसें करूं भूतांतें. ॥ २५० ॥
—सभा. १२.

परंतु ' जीर्ण कवींजवळ एकेका अक्षराची भीक मागणाऱ्या ' कवींचें काव्य आम्हांला नको, असें म्हणणाऱ्या पंडितांना मुक्तेश्वरांनीं जरा खोंचदार उत्तर दिलें आहे:—

व्यास वाढितां जगातें । ग्रास लाधला जीर्ण कवींतें ।
त्यांचे मुखींचीं उच्छिष्ट शितें । म्यां दुर्बळें वेंचिलीं. ॥१७५॥
तीं सेवोनिया पावलों तृप्ती । तेणें उद्गारली स्फूर्ती ।
हे वल्गना संतांप्रती । नेणतपणें करीतसों. ॥ १७६ ॥
कितीएकासी आग्रह मोठा । नातळों म्हणती कविउच्छिष्टा ।
हा समर्थवाद योग्य श्रेष्ठा । ईश्वरकृपा म्हणोनि. ॥ १७७ ॥
मार्गस्था तंतू एकू एकू । मिळूनी चिंध्या देवीचा रुखू ।
समर्थ म्हणवी तेवीं रंकू । कविउच्छिष्टा पावलों. ॥ १७८ ॥
एक एक अक्षराची भीक । जीर्ण कवींतें मागूनी देख ।
मी सर्वज्ञ कविनायक । ऐसें म्हणविलें लौकिकीं ॥ १७९ ॥

—सभा. ५.

कित्येक ठिकाणीं अभिमान व विनय यांचें मोठें मिष्टें मिश्रणही पहावयास मिळतें:—

व्यास, वैशंपायन, सौती । तिघांमुखींचें उच्छिष्ट क्षितीं ।
सांडलें तें सज्जनमतीं । स्वीकारूनी अनुवादें. ॥ १७६ ॥
लीलाविश्वंभरप्रसादें । मुक्तेश्वरअवधूतगुणानुवादें ।
भारतनलिनीचीं अरविंदें । महादाख्यान सुपंक्ती ॥ १७७ ॥
चतुरचंचरीकांची मांदी । सेवितां मातली ब्रह्मानंदीं ।
' साधु साधु ' इहीं शब्दीं । गुंजारवें गर्जत. ॥ १७८ ॥

—आदि. २०.

इति श्रीभारत आदिपर्वसागर । अवगमे मानससरोवर ।
राजहंस श्रोते चतुर । प्रेमानंदें क्रीडती. १७५ ॥

शब्दमोतियांचा चारा । चरोनी देती सुखढेकरा ।
पुढें प्रार्थिती मुक्तेश्वरा । कथा सादर परिसवीं. ॥ १७६ ॥

—आदि. २५.

इति श्रीभारते आदिपर्वणि । व्यासोक्ती तेच मंदाकिनी ।
वैशंपायनओघ जनीं । मित्रात्मजा जाणिजे. ॥ ११२ ॥
अर्थ गुप्त सरस्वती सुंदर । तो स्वामी लीलाविश्वंभर ।
भरतां त्रिवेणीओघपरिकर । अक्षय्यवट जनमेजया ॥११३॥
श्रवणतीर्थीं तीर्थविधान । सांगतां तीर्थउपाध्या ब्राह्मण ।
मुक्तेश्वर परम दीन । कीं तो किंकर संतांचा. ॥ ११४ ॥

—आदि. ३७.

इति श्रीमहाभारते आदिपर्वणि । मुक्तेश्वरगिरा तारकावर्णी ।
अर्धचंद्रमा सुधाकिरणीं । जेवीं श्रवणीं आर्त चकोरा. ॥१०५॥
श्रीगुरुज्ञानकृपेची पौर्णिमा । पाहे तरीच लाहे उपमा ।
येरवीं वल्गना न ये कामा । आम्हां मूढ कवींची. ॥ १०६ ॥

—आदि. ३४.

## ३२ दोषदर्शन.

येथपर्यंत मुक्तेश्वरांचे कुलगोत, शिक्षण, ग्रंथ, रचनापद्धति, सामाजिक व राजकीय मतें, काव्यगुण ( व कांहीं अवगुण ), यांचें विवेचन यथाशक्ति करण्यांत आलें आहे. आतां ज्यांचा कांहीं ऊहापोह झाला नाहीं, अशा अवगुणांचा—दोषांचा—विचार करूं.

( अ ) मुक्तेश्वरी काव्यांत आढळणारा जो कालविपर्यासाचा दोष, त्याचा मागें निर्देश केलाच आहे. दुष्यंताचा किंवा पांडवांचा दिग्विजय वर्णीत असतां इंग्रज, फिरंगी, जावी, पठाण, उजबेख, इत्यादि म्लेच्छांचा, व मुलतान, हबशान, बदकशान, इत्यादि देशांचा, उल्लेख करण्यांत; कौरवपांडवांच्या युद्धप्रसंगीं मराठे, कानडे, तेलंगी, फिरंगी, इत्यादिकांच्या लढण्यांच्या पद्धती वर्णण्यांत, आणि ऋतुपर्णाच्या तोंडांत ‘ लीलावती ’ ग्रंथाचें नांव कोंबण्यांत, जरी इतिहाससंशोधकांस उपयोगीं

पडतील अशा गोष्टी मुक्तेश्वरांनीं नमूद केल्या असल्या, तरी तसें करण्यांत त्यांनीं आपणास कालविपर्यासाच्या दोषाला पात्र करून घेतलें आहे, ही गोष्ट सूर्यप्रकाशासारखी ढळढळीत आहे, मग ती नाकबूल करण्यांत कोणास कांहीं शतकृत्य वाटत असेल तर खुषाल वाटो. शेक्सपीअरनें कालविपर्यासाचा दोष केला आहे, म्हणून त्या दोषाचें दोषरूप झडतें असें नाहीं. ज्या कालाविषयीं आपण लिहीत आहों, त्या काळच्या परिस्थितीशीं परिचय नसला म्हणजे विषयाशीं व्हावें तसें लेखकाचें तादात्म्य होणार नाहीं, हें स्पष्ट आहे. तसेंच आपण गतकालाविषयीं जें लिहीत आहों, तें सद्यःकालाला लागूं पडावें, त्यांत सद्यःकालीन समाजाचा संबंध आणावा, व स्वकीय ज्ञान संक्रमित करून श्रोत्यांस आपल्यासारखें शाहाणें करून सोडावें, अशी उत्कट उत्कंठा असली, म्हणजे गतगोष्टी व वर्तमान गोष्टी यांचें मिश्रण होणें संभवनीय आहे. हीं कारणेंच मुक्तेश्वरांच्या ग्रंथांतील कालविपर्यासाचीं आहेत. आतां हा कालविपर्यास दोष काव्यहेतूच्या फारसा आड येत नसल्यामुळें सर्वस्वीं क्षम्य आहे.

( आ ) दुसरा मुक्तेश्वरी काव्यांतील दोष म्हटला म्हणजे कित्येक ठिकाणचा, देश, यति, राजे, पक्वान्नें, इत्यादिकांच्या नांवांचा वेडावांकडा पाल्हाळ. याचा ऊहापोह मागें करण्यांत आला आहे.

( इ ) मुक्तेश्वरांत आढळणारा तिसरा दोष म्हणजे अचरट विनोद होय. हा विरळाच दृष्टीस पडतो, पण तो पडला म्हणजे मनाला किळस वाटतो व सभ्यतेचें निष्कासन केल्याबद्दल, व भक्तिरसाचा भंग केल्याबद्दल, कवीचा रागही येतो. राजसूययज्ञसमाप्तीनंतर भोजनाच्या वेळीं द्रौपदीची कौरवांनीं जी धांदल उडविली व कित्येकांनीं तिशीं जो विनोद केला, तिचें वर्णन मुक्तेश्वर करितातः—

**सहस्र पदार्थ सहस्रजणीं । मागितले एकेच क्षणीं ।**
**सहस्र व्याघ्र गर्जतां वनीं । जेवीं हरणी बोथरे ॥ ७६ ॥**
**कोणीं भक्ष्य, कोणीं भोज्य । कोणीं दुग्ध, कोणीं आज्य ।**
**म्हणती, ' वहिनी हें काज । तुमचें नोव्हे वाढावया ॥ ७७ ॥**
**एक वृषभ एका रुखा । झगडतां थरकती सकळ शाखा ।**
**पंच कुंजर भिडतां देखा । ठाव नुरे कर्दळीचा ॥ ७८ ॥**

तेवीं तुम्हांस झाले रातीं । त्यालागीं शरीरीं नाहीं शक्ती ।
असो आज तुमचे हातीं । एकादशी आमुतें ॥ ७९ ॥

—सभा ९.

यांतील ७८ व ७९ या पद्यांतील अचरटपणा व अश्लीलपणा पाहून कोणास उद्वेग येणार नाहीं ? आतां यास व्यासभारतांत आधार असता, तर मुक्तेश्वर थोडें-बहुत अचरटपणाच्या दोषांतून मुक्त होते. परंतु याला भारतांत मुळींच आधार नाहीं. तेव्हां आपली व आपल्या वाचकांची विनोदबुद्धि तृप्त करण्यासाठीं मुक्तेश्वरांनीं असा अचरटपणाचा प्रसंग कल्पावा, हें आमच्या दृष्टीनें अत्यंत अश्लाघ्य आहे.

तसेंच सभापर्वांतीलः—

लड्डुक देखुनी विनायक । नृत्य करीत प्रसन्नमुख ।
हस्तशुंडा प्रचंड मोदक । झेलीतसे आवडीं. ॥ ११४ ॥
सूक्ष्म सेवयाचे सुरसपूर । चणकपिष्टाचे अरुवार ।
लाडू भक्षितां जेवणार । वेडाविती गणेशा. ॥ ११६ ॥

—सभा. ९

हें वर्णन व रामायणांतील

जया रासभें रक्षणें राक्षसाचीं । निकी वृत्ति हे साधिली नापिकाची ।
नराळी तनू चंडिके दासिधर्मी । भलें गोंविलें रावणें पापकर्मी ! ॥१२॥
शेवया, शर्करा, लाडू चतुर्थीमाजि भक्षिले ।
भरितें, रोटिया, कांदे, खादले पायलीभरी ॥ १३ ॥
मेंढरें नवसा घेसी रेणुके ! चंडिके ! शिवे ! ।
तयाचें उसणें जाणा; बोल कोणा न लावणें. ॥ १४ ॥

—सुंदरकांड.

असा चंडिकागणपतिप्रभृतींबरोबर बोलणाऱ्या मारुतीच्या तोंडीं घातलेला विनोद आमच्या मतें भक्तिभंजक आहे.

( ई ) अतिशयोक्तीची मुक्तेश्वरांस फार हौस आहे. परंतु अतिशयोक्तीलासुद्धा

थोडीशी मर्यादा पाहिजे, नाहींतर काम अगदींच बेताल होऊन, हरिदासी गप्पांच्या तोडीला काव्य येऊन बसतें. राजसूययज्ञांत अन्नसामग्रीचें वैपुल्य मुक्तेश्वर असें वर्णितातः—

**शर्करेचिया वाळवंटीं। घृतसरिता धांवती लोटीं!।**
**दुग्धनदीच्या संगमबेटीं। पायसान्नें निपजलीं!॥ ९८॥**
**दधिमधूचें सरोवर। समुद्रतुल्य महाथोर!।**
**कोरूनी कनकाचे गिरिवर। हेमरांजणीं शिखरणी.॥ ९९॥**
**ओदनाचे चंद्राचळ। वरान्नाचे कनकाचळ।**
**नवनीताचे हिमाचळ। द्रोणाचळ शाकांचे.॥ १००॥**
**आणीक भक्ष्यांचे पर्वत। भंगूं न शके अमरनाथ।**
**तोही अर्जुनरूपें तेथ। वाढावाढी करितसे.॥ १०१॥**
**वज्र खंडोनी हस्तकीं। दशन झाले भोक्त्यांमुखीं।**
**आवडी वेधले स्वादसुखीं। दिव्यभक्ष्य भक्षावया.॥ १०२॥**

—सभा. ९

( उ ) चौथा दोष म्हटला म्हणजे अश्लीलपणाचा. शुकरंभासंवादांत याचे भरपूर नमुने आढळतील. आतां त्या संवादांत 'विषयविडंबन' हाच हेतु असल्यामुळें तेथील अश्लीपणा विषयास साजेसाच आहे, असें कित्येकांचें म्हणणें पडेल. परंतु आमच्या मतें विषयविडंबन, याच्यापेक्षां अधिक कडक पण अधिक सभ्य रीतीनें करितां आलें असतें. आतां 'भेदाभेदौ सपदि गलितौ, को विधिः, को निषेधः,' अशी ज्याची स्थिति, त्या शुकाला सभ्य काय आणि असभ्य काय, प्रौढ काय आणि ग्राम्य काय, सुश्लील काय आणि अश्लील काय, सर्व सारखेंच; असा कोटिक्रम कोणीं केला, तर मात्र आम्हांस तोंड मिटणें भाग आहे. पण याशिवाय इतर प्रकरणींही मुक्तेश्वरांच्या काव्यांत जो बेताल अश्लीलपणा आढळतो, त्या ठिकाणीं कवींच्या वतीनें वरील प्रकारची सबबही आणतां येणार नाहीं, असें वाटतें. शकुंतलेची भरदरबारांत निर्भत्सना करणाऱ्या दुष्यन्ताच्या तोंडांत मेनकेसंबंधें जे * शब्द कवीनें घातले आहेत, ते कवीला अश्लीपणाची जरा कमी हौस असती, व त्यानें

* आदि. १६।१७०–१७३.

काल, प्रसंग, स्थळ, यांचा यत्किंचित विचार केला असता, तर ते तसे योजण्याचें त्याला खात्रीनें धाष्टर्य झालें नसतें. निर्जन अरण्यांत आपल्याशीं अतिप्रसंग करणाऱ्या रंभेला उद्देशून गलितभेदाभेद, निर्विकार, निःसंग, अशा शुकानें जे अश्लील बोल उच्चरावे, †तेच भरदरबारांत दुष्यंतासारख्या लोकप्रिय, सदाचारसंपन्न, व विद्यासुसंस्कृत सार्वभौमाकडून शकुंतलेच्या समोर तिच्या आईविषयीं कवीनें वदवावे, यापेक्षां अधिक अप्रयोजकपणा व फाजीलपणा तो कोणता? अश्लील स्थळें या पुस्तकांत उतरून घेण्याला आमचें मन धजत नाहीं. तरीपण चौकस वाचकांकरितां अशा स्थळांचें केवळ दिग्दर्शन करितों. ती पाहून वरील विधानांचें वाटल्यास त्यांनीं प्रत्यंतर घ्यावें आदि. ९।५०–५५; १५।११८–१२०;; १६। १४०–१४२; १६।१७२–१७३; २३।१२८–१२९; २३।१४०–१४२: २५। १७३; ३४।३५. सभा. ९।७७-७९ विराट. ६। २३. आदि. ४४। ११४–११७ इत्यादि. या स्थळांचा विचार केला असतां, असें दिसून येईल कीं, बहुधा उपमा, रूपक, किंवा दृष्टांत, साधण्याकरितांच कवीनें अश्लीलपणालाही आलिंगन दिलें आहे. अशा या अलंकाराचा उठाव किंवा निर्वाह चांगला झाला आहे, म्हणून अश्लीलपणाचें मंडण करावें कीं काय, हाच प्रश्न आहे. एकादा दृष्टान्त किंवा रूपक चांगलें साधलें, म्हणजे सभ्याचार, शिष्टसंप्रदाय, व मर्यादा, यांना धाब्यावर बसवावें, हें योग्य वाटत नाहीं. संस्कृत कवींनीं, किंवा कांहीं जुन्या आंग्ल कवींनीं, असाच फाजीलपणा केला असला, तरी त्यानें मुक्तेश्वरांचा बचाव होईल, असें वाटत नाहीं. सोम्याचे दोष दाखविल्यानें गोम्याच्या दोषाचा निरास होईल, हें तत्व मान्य नाहीं. मुक्तेश्वर श्रेष्ठ दर्जाचे कवी आहेत, ह्मणून ते जें जें लिहितील, तें तें योग्यच आहे, असें ह्मटलें पाहिजे, असें नाहीं. विश्वामित्राचा तपोभंग करण्याविषयीं इंद्र मेनकेला आग्रह करीत असतां, त्यानें केलेल्या ( आदि. १६।११८०९ ) भाषणांतील रूपकाची संपादणी नीट झाली आहे खरी, परंतु त्याची स्तुति कोणत्या तोंडानें करावी, हेंच आम्हांला समजत नाहीं. तसेंच कुमारिका शकुंतलेला आपली पत्नी होण्याविषयीं कण्वाश्रमीं विनवीत असतां, दुष्यन्तानें त्या कुमारिकेजवळ केलेलें संभाषण ( आदि, १६।४१ ) योग्य आहे, असें म्हणवत नाहीं. एकंदरींत मुक्तेश्वरांना रूपकदृष्टान्तादि अलंकारांची हौस अनावर होती, हेंच खरें.

† आदि. १६।१७०–१७३ या ओंव्यांतील कल्पना व बहुतेक शब्दही शुकरंभासंवाद ४१४–४२१ या ओंव्यांशीं जुळतात, अर्थात शकुंतलाख्यानापेक्षां शुकरंभासंवादांत विस्तार जास्त आहे,

दुष्यन्त राजाची स्वारी शिकारीस जात असतां, पौरांगनांनीं त्याच्यावर सुवर्णकुसुमांचा वर्षाव केला. त्या वेळची त्या पौरस्त्रियांची जी कामोपहत स्थिति वर्णिली आहे व तीसंबंधें लिहीत असतांना, एकंदर स्त्रीपुरुषांच्या नीतीसंबंधानें मुक्तेश्वरांनीं जो संशय प्रकट केला आहे, तो अश्लाघ्यच म्हटला पाहिजे.

## ३३ परोपदेशे पांडित्य.

व्यासभारतांत नाहीं, असें भारूड आपल्या ग्रंथांत दडपल्याबद्दल मुक्तेश्वरांनीं आपल्या पूर्वींच्या प्राकृत[1] ग्रंथकारांना टोले हाणलेले आहेत. परंतु स्वतः मुक्तेश्वरांनींही व्यासकृतींत नाहींत असे प्रसंग[2] आपल्या काव्यांत घातले आहेत. तेव्हां आपण जें करितों, त्याबद्दलच दुसऱ्यांस नांवें ठेवणें योग्य नाहीं, हें मुक्तेश्वरांनीं ध्यानीं आणावयास पाहिजे होतें. तसेंच महाभारताच्या निरनिराळ्या पोथ्यांत बराच फरक होता व आहेही. तेव्हां अमुक एक वर्णन भारतांत आहे कीं नाहीं, हें सांगणें जरा कठिणच आहे. मुक्तेश्वरांचे वनपर्वांत हरिश्चंद्राख्यान सांपडतें, परंतु तें उपलब्ध भारती पोथींत आढळत नाहीं, मोरोपंतांच्या वनपर्वांत हरिश्चंद्राख्यान नाहीं. परंतु याबद्दल मुक्तेश्वरांस ठामपणानें व्यासपथ सोडल्याचा दोष देतां येईल, असें वाटत नाहीं. श्रीधरांनीं आपल्या पांडवप्रतापांतील वनपर्वांत हरिश्चंद्राख्यान दाखल केलें आहे, व मुक्तेश्वरांप्रमाणेंच श्रीधरांचाही व्यासास धरून चालण्याचा बाणा आहे. तेव्हां त्यांच्याजवळील भारतीपोथ्यांत हें आख्यान [illegible] होतें, असें म्हणणें भाग पडतें. एकंदरींत, भारती पोथ्यांत [illegible] फरक आढळत असल्यामुळें, मुक्तेश्वरांनीं प्राकृत कवींना दिलेले टोमणे [illegible]फळ [illegible] जरासंधवधप्रकरणीं मुक्तेश्वर म्हणतात,—

> क[illegible] ग्रंथांतरीं । संकेत दाविला श्रीमुरारीं ।
> खं[illegible] धरूनि करीं । मध्यभागीं चिरियेलें. ॥ ६० ॥
> सव्य अपसव्य सांडितां करें । मग न जडतीच परस्परें ।
> परी हें व्यासऋषीश्वरें । कथिलें नाहीं भारतीं ॥ ६१ ॥

—सभा. ७

---

१ आदि. ४१।७२।७३; सभा. ७।६०।६१; वन. १।५८.

२ सभापर्व, पृष्ठ १०७।१०८ वरील टीप पहा, ( काव्यसंग्रहग्रंथमाला ); २ मुक्तेश्वरी फुट काव्यें, प्रस्तावना, ( काव्यसंग्रहग्रंथमाला ) पहा.

परंतु मुक्तेश्वराचे ग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचणारे, व व्यासाची कास सोडावयाची नाहीं अशी दृढ प्रतिज्ञा करणारे, श्रीधरस्वामी आपल्या पांडवप्रतापांत वरील प्रकारचेंच वर्णन करितात, त्यावरून भारती पोथ्यांचें भिन्नत्व व मुक्तेश्वरांच्या घावांचें वैय्यर्थ चांगलेंच सिद्ध होतें.

## ३४ उपसंहार.

मुक्तेश्वरांच्या उपलब्ध ग्रंथांचें आलोडन करून, व त्यांत आढळलेल्या त्यांच्या स्वतःविषयींच्या माहितीचे अल्प कण एकत्र करून, जें मुक्तेश्वर रिचत रचितां आलें, तें वाचकांस सादर केलें आहे. असें करितांना मुक्तेश्वरांसंबंधीं प्रचलित असलेल्या बऱ्याचशा दन्तकथा व समजुती यांचा फोलपणा आम्हीं आपल्या दृष्टीनें सिद्ध केला आहे. एकंदर विवेचनपद्धतींत आम्हीं आपल्याकडून आग्रहापेक्षां सारासारविचाराला व तर्कशुद्ध तत्त्वालाच जास्त मान दिला आहे. मुक्तेश्वरांच्या काव्यांतील गुणदोष दाखवितांनाही विकारवशतेला आम्हीं थारा केलेला नाहीं. रसिक वाचक या अल्प कृतीचा योग्य समाचार घेतील अशी आशा आहे.

समाप्त.

*